# नाशिकचीं द्राक्षें

[ फेब्रुवारी १९४३ मधील महात्माजींच्या उपवासाच्या वेळीं नाशिक जेलमध्यें लिहिलेली डायरी ]



लेखक

रामकृष्ण नारायण अष्टपुत्रे, धुळें



सन १९४५ ]  [ किंमत १। रुपाया

प्रकाशक
गो. स. मद्‌ाने
संचालक, भारत-प्रकाशन,
नवग्रही, धुळें.







# अर्पण-पत्रिका

ज्यांच्यापासून मिळालेल्या संस्कारानें, उत्तेजनानें व प्रेमळ
आशीर्वादानें चिकित्सापूर्वक स्वतंत्र विचार करण्याची
गोडी मला लागली

त्या

**ती. दादा व ती. सौ. आई**

यांच्या चरणीं

**आदर व प्रेमपूर्वक समर्पण**



मुद्रक
न. वि. सरदेशपांडे,
आदर्श मुद्रणालय
३९५।५ सदाशिव पेठ, पुणें २.

# प्रस्तावना

१९४२ च्या राष्ट्रीय आंदोलनात नाशिकच्या तुरुंगात दीर्घकाल वास करण्याची सुसंधि प्राप्त झाली. अनेक थोर कार्यकर्त्यांचा तेथे परिचय झाला. तथापि वाचन आणि लेखन हे तुरुंगातील दोन मोठे मित्र असतात. त्याच्या संगतींत काल आनंदानें निघून जातो. या ठिकाणीं विद्यार्थी संघटने-वरील माझे विचार पुस्तकरूपाने लिहीत असता, 'व्यक्तित्वविकास' या विभागात, आपला विकास घडवून आणण्याच्या कामीं ज्या साधनाचा उपयोग करून घ्यावयाचा त्यापैकीं लेखन हे एक प्रमुख साधन आहे असे मी म्हटले होतें. या मुद्याचे विवेचन करीत असता मी लिहिल होतें:— '...आपल्या मनातील खळबळींना कागदावर उतरविण्याच्या प्रक्रियेत विचारांना एक प्रकारची सुसंगति प्राप्त होते व ते व्यक्त करण्याची एक कला विचारात आणि लेखनात उत्पन्न होते. ... विचार एरवीं अस्पष्ट, अव्यवस्थित स्वरूपात मनोवितानात पसरलेले असतात, पण लेखनासाठीं लेखणी उचलून, बुद्धीला आज्ञा केली कीं, ती सर्व स्पष्ट-अस्पष्ट विचारांना त्याच्या त्याच्या जागेवरून ओढून आणून एका क्रमाने शिस्तींत उभी करते...रसग्राही वाचन हे अत्यंत उद्‌बोधक, आनंददायक, विचारप्रवर्तक आणि बुद्धीला सूक्ष्मता देणारे असतें. ...' इ.

वरील विषयावर लिहीत असता नित्य नवे नवे विचार व कल्पना मनात उत्पन्न होत आणि त्या सर्वांचा मी लेखनात उपयोग करीतहि असे. अशाच प्रकारच्या एका कल्पनालतेपासून '**नाशिकच्या द्राक्षाचा**' जन्म झाला आहे.

लेखनाच्या अनेक अंगाचा विचार करीत असता मी लिहिलें होते कीं, दररोज व्यवहारात ज्या गोष्टी घडत असतात, ज्या व्यक्तींशीं आपला संबंध येतो, जे लहानमोठे उद्‌बोधक प्रसंग घडून येतात, जें वाङ्मय वाचनात येतें, जे आपण ऐकतो—पाहतों, त्यासंबंधीं आपल्या मनात काहींतरी विचार उत्पन्न होतातच, ते जसेच्या तसे लिहून काढावे. या मुद्याचें सविस्तर विवे-चन करीत असता, त्याचे प्रात्यक्षिकहि माझ्याकडून चालूच होतें. याच वेळीं महात्मा **गांधींच्या** उपवासानें देशातील वातावरण गंभीर आणि विल-क्षण खळबळीचें झालें. रसिक वाचकापुढें रसग्रहणासाठीं ज्या द्राक्षाचा घोंस पुढें केला आहे तीं या ऐतिहासिक घटनेच्या वेळींच पोसलीं गेलीं असल्यानें साहजिकच त्यातील काहींमध्यें त्या त्या वेळच्या विचाराचें आंदो

ळन प्रतिबिंबित झालेलें दिसून येईल. जे विचार मनात आले ते तसेच लिहून काढले. साधारणः एक महिन्याच्या कालावधींत त्या वेळच्या राष्ट्रीय व आतरराष्ट्रीय घटनासंबंधीं जे विचार मनात आले, ज्या व्यक्तींचा विशेष परिचय झाला अगर जसा संबंध आला, जें कांहीं वाङ्मय वाचनात आलें, जी चर्चा केली, त्या सर्वांबाबत मनावर झालेल्या प्रक्रियाचें प्रतिबिंब जसेंच्या तसें प्राजलपणें कागदावर उतरलें गेलें. त्यामुळें एकाच विषयाचें संपूर्ण विवेचन कोठेंच आढळून येणार नाहीं, पण अनेक विषयावरील त्रोटक विचार सर्व ठिकाणीं विखुरलेले दिसतील. इंग्रजीमध्यें कांहीं लेखकानीं आपल्या दिनचर्या प्रसिद्ध केल्या आहेत. त्यापैकीं कांहींचें स्वरूप कांहीं बाबतींत अशाच प्रकारचें आहे आणि मला तें आवडलें. त्याच्या वाचनानें अशा प्रकारच्या लेखनासंबंधीं माझ्या कल्पना अधिक स्पष्ट झाल्या हें लिहिणें आवश्यक आहे.. अशा प्रकारचीं पुस्तकें मराठींत प्रसिद्ध झालेलीं माझ्या तरी पाहण्यात फारशी नाहींत. आणि त्या दृष्टीने मराठी वाचकाना नाशिकच्या प्रख्यात भूमींत उत्पन्न झालेलीं हीं द्राक्षे अभिनव वाटल्याशिवाय राहणार नाहींत असा विश्वास आहे. त्यातील रसगुणासंबंधीं रसिकानींच ठरवावें.

क्षयरोगासंबंधीं विशेष अभ्यास करण्यासाठीं दक्षिण हिंदुस्थानातील सुविख्यात अशा आरोग्यवरम् (मदनापल्ली) येथील क्षयरोग्याच्या आश्रमात (Sanatorium) मी सध्या आलो असल्यानें माझीं हस्तलिखितें, माझे मित्र व अनेक सार्वजनिक कार्यांतील सहकारी भारत प्रकाशनाचे संचालक श्री. गोपाळराव मदाने याच्या स्वाधीन करण्यापलीकडे पुस्तकप्रसिद्धीच्या कामात मी कांहींच केलें नाहीं. पुस्तकातील इंग्रजी उताऱ्याचें भाषांतर मूळच्या हस्तलिखितात नव्हतें तें श्री. मदाने यानींच करवून घेतलें आहे. शिवाय हल्लीं छपाईसंबंधाच्या अडचणी सगळीकडे भासत असता हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें कार्य हें त्याच्या चिकाटीचें फळ आहे आणि त्याबद्दल आभार मानून त्याच्या मित्र-ऋणातून मी थोडाच मुक्त होणार आहें ! इतर ज्यांचें ज्यांचें साहाय्य या कामीं झालें त्या सर्वांचे मी आभार मानतों.

आरोग्यवरम्
रंगपंचमी, शके १८६६.

[signature]

# नाशिकचीं द्राक्षें

कथं वातो नेलयति कथं न रमते मनः ।
किमापः सत्यं प्रेप्सन्तीर्नेलयन्ति कदा चन ॥

—अथर्व वेद १०–७–३७

( भावार्थ—वारा निश्चल का राहत नाहीं ? मानवी मनाला विश्रांति कां वरें माहित नाहीं ? आणि खरोखर, पाणी कोठें आणि कशाच्या शोधात सारखें वाहत आहे व क्षणभरहि थांबत नाहीं ? )



## ता. ११–२–१९४३

आज आम्हाला वर्तमानपत्रें उशीरा मिळालीं आणि तीं मिळालीं तेव्हां सर्वांना विजेच्या धक्क्याप्रमाणें एक विलक्षण धक्का बसला. महात्मा गांधींनीं २१ दिवसांचा उपवास सुरू केल्याची बातमी त्यांत आली होती. व्हाईसरॉय व महात्माजी यांच्यामधील पत्रव्यवहारहि प्रसिद्ध झाला होता. पण या पत्रव्यवहाराची कुणालाच अगोदर कल्पना नसल्यानें आणि गांधींचा उपवास सुरू हि झाल्यानें सर्वांना विलक्षण आश्चर्य वाटलें. पण त्यात आश्चर्यापेक्षां चिंतेचीच छटा जास्त होती आणि ही चिंता गांधींच्या प्रकृतीबद्दल होती. साऱ्याचे चेहेरे एकदम गंभीर झाले. साऱ्या हिंदुस्तानभर प्रत्येक व्यक्तीच्या हृदयावर असाच गंभीर आघात झाला असला पाहिजे. गांधींचें जनमनावर किती वजन आहे याची पुनः यावेळीं आणखी एकदा प्रचीति आली. या महापुरुषाचा भारतीयांच्या हृदयावर इतका अद्वितीय प्रभाव आहे कीं, प्रत्येकाला त्याच्या उपवासाची बातमी वाचून आणि ऐकून आपल्या हृदयाचाच कचका कोणी तोडीत आहे असें वाटलें. गांधींचा देह

आणि त्याचा प्राण हा आतां त्याचा स्वतःचा राहिला नसून तो साऱ्या राष्ट्राच्या मालकीचा झाला आहे. गांधींनीं प्राणान्तिक उपवास सुरू केला नाही हें खरें, पण तीन आठवड्याचा दीर्घ उपवास या वयोवृद्ध तपस्व्याला कसा निभावून नेईल कुणाला ठाऊक, अशी चिंता प्रत्येकाच्या मनात वाटल्यावाचून राहिली नाहीं. एका परी त्याचा प्राण पणाला लागला असेंच म्हटलें पाहिजे. आणि गांधींचा प्राण म्हणजे राष्ट्राचा प्राणच पणाला लावण्यासारखें आहे हें आमच्यातील प्रत्येक व्यक्तीच्या चेहऱ्यावरून दिसून येत होतें.

गांधींच्यावर लोकांची श्रद्धा किती गाढ आहे याचें एक प्रत्यंतर कांहीं दिवसापूर्वीं येथेंच तुरुंगात आलें होतें. डॉ. जीवराज मेहता यांची प्रकृति कांहीं बरोबर नसताहि त्याना एकाएकीं या तुरुंगातून दुसरीकडे कोठेंतरी नेण्यात आलें होतें. त्याना कोठें नेलें हें अर्थातच कळलें नाहीं. आणि आजहि आम्हाला तें माहीत नाहीं. तथापि डॉ. जीवराज हे गांधींचे वैद्यकीय सल्लागार हें सर्वश्रुत असल्यानें व त्याच सुमारास तपस्वी भणसाळींचा दिव्य उपवास चालू असल्यानें त्याच वेळीं महात्माजींनींहि उपवास सुरू केला आहे किंवा काय आणि त्या वेळीं त्याच्याजवळ डॉ. जीवराज असावे म्हणून त्याना नेलें आहे किंवा काय अशी एकच शंका प्रत्येकाच्या मनात चमकून गेली आणि सर्वांनीं एकत्र जमून डॉ. जीवराज याना जाताना जो गंभीरपणें निरोप दिला त्या वेळीं गांधी या राष्ट्रपुरुषानें सर्वांच्या हृदयांत जें जिव्हाळ्याचें स्थान मिळविलें आहे त्याचें कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

गांधींना नेहमीं गौतम बुद्धाची उपमा देण्यात येते. ही उपमा दोन प्रकारानीं देण्यात येते. कांहीं लोक मोठ्या आदरानें भगवान् बुद्धाशीं गांधींची तुलना करून त्याच्या अहिंसा तत्त्वाविषयीं व त्याच्या अनासक्त जीविताविषयीं आपला पूज्यभाव व्यक्त करतात. याच्या उलट त्याच्या अहिंसावादाचा उपहास करणारे लोक असें प्रतिपादन करतात कीं, बुद्धानें अहिंसा धर्माचा प्रसार करून राष्ट्रातील क्षात्रतेज नष्ट केलें, प्रतिकारक्षमता नाहींशी केली आणि त्यामुळें परकीयाच्या स्वाऱ्या आपल्या देशावर

अव्याहत चालू राहिल्या आणि शेवटीं मुसलमानाचें साम्राज्य हिंदुस्तानभर पसरलें. त्याला कारण बुद्धाचें अहिंसा धर्माचे प्रतिपादन! बुद्धाच्या अहिंसा-धर्मानें हिंदुस्तानचें नुकसान केलें किंवा काय हा प्रश्न बाजूस ठेवून त्याच्या व गांधींच्या अहिंसाधर्माचा तुलनात्मक दृष्टीनें आपण विचार करूं लागलों तर असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं कीं, गौतम बुद्धाच्या अहिंसा धर्मा-पेक्षां गांधींचें अहिंसेचें तत्त्वज्ञान अधिक वास्तव, अधिक व्यापक आणि अधिक टिकाऊ आहे. जगांतील दुःखाचा तिटकारा घेऊन व दीन दुबळयांची दया वाटून दुःखाच्या उपशमार्थ भूतदयाप्रेरित अशा अहिंसा धर्माची बुद्धानें प्रस्थापना केली. जगातील व्यवहारात न पडता व्यवहार-विन्मुख होऊन त्याचा आचारधर्म आचारात आणावयाचा होता पण अशानें जगातील प्रश्न सुटत नाहींत. गांधींनीं आपल्या अहिंसा धर्माचा उपयोग युयुत्सु वृत्तीनें राष्ट्रातील राजकीय, आर्थिक, सामाजिक अशा सर्व क्षेत्रांत लागूं केला. एवढेंच नव्हे तर आंतरराष्ट्रीय संबंधातहि त्याचा कसा उपयोग करतां येईल, हें त्यानीं दाखवून दिलें आहे. व्यवहाराला व संसाराला भिऊन दूर न पळता जगात उत्पन्न होणारे सर्व प्रकारचे प्रश्न युयुत्सु व श्रद्धायुक्त, अभय चित्तानें सोडवूं पाहणारा गांधींचा अहिंसावाद हा बुद्धाच्या अहिंसाधर्मापेक्षा खात्रीनें श्रेष्ठ आहे आणि मानवसमाजाच्या स्वभावाचें मर्म समजून घेऊन त्याच्या विकासशीलतेवर त्याची उभारणी केली असल्यानें तो जास्त टिकाऊहि आहे आणि याच दृष्टीनें गांधींचा अहिंसाधर्म हा अद्वितीय आणि अपूर्व असा आहे. आजपर्यंतच्या इतिहासात अशा प्रकारचे राष्ट्रान्तर्गत आणि आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडवूं पाहणारे अहिंसेचें तत्त्वज्ञान कोणी प्रतिपादिलेंहि नाहीं. आणि कोणी तें इतकें यशस्वी करूनहि दाखविलें नाहीं. **ख्रिस्त–बुद्ध–महंमद** इत्यादि महात्म्यानीं प्रेमाचा उपदेश केला आणि सर्वांचें जीवित सुखाचे व्हावें म्हणून आपलें जीवितहि वेंचलें पण प्रेममय अहिंसा धर्माची शास्त्रीय पायावर उभारणी करून तिची सिद्धान्तप्रणालि बांधण्याचें व त्या प्रणालीच्या अनुसार आपले शास्त्रीय ' प्रयोग ' चालू ठेवण्याचें महान् कार्य महात्मा गांधींनींच केलें. हा महत्त्वाचा फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मनुष्य एखादें तत्त्व व्यवहारात प्रत्येक क्षेत्रात आचर-

णांत आणूं लागला कीं, त्या तत्त्वाची मांडणी आणि त्याचा विकास हीं अत्यंत शास्त्रशुद्ध पायावर करावीं लागतात आणि त्या तत्त्वाच्या उत्कर्षाचें आणि उपयुक्ततेचें बीज या शास्त्रीय पायातील भक्कमपणावरच अवलंबून असतें. संसारात राहूनहि प्रेममय अहिंसामार्गाचा अवलंब करून प्रत्येकाला स्वतःच्या उन्नतीबरोबरच आपल्या समाजाची व राष्ट्राची उन्नति कशी करता येईल हें गांधीवाद दाखवितो. मनुष्याचें श्रेष्ठतम कर्तव्य म्हणजे केवळ आपली स्वतःचीच उन्नति करून घेणें हें नव्हे तर ज्या समाजात आणि राष्ट्रात आपला जन्म झाला त्या समाजाची आणि राष्ट्राची सेवा करणें हें होय आणि या प्रवृत्तिपर दृष्टीनें गांधींच्या तत्त्वज्ञानात गीतेचा सदुपदेश पूर्ण विकास पावला आहे असें दिसून येईल.

राजकारणात उपवास आणावा किंवा नाहीं हा एक मोठा वादाचा प्रश्न आहे. तथापि यासंबंधात सर्वसामान्य असा कोणताहि सिद्धांत न बांधता असें म्हणणें जरूर आहे कीं, सामान्य जनाचें मोजमाप गांधींसारख्या अद्वितीय व्यक्तीच्या बाबतींत लावणें बरोबर नाहीं. गांधींसारखी व्यक्ति हजारों वर्षांत एखादाच होते आणि जरी सर्व जगाला आणि जगातील सर्वसाधारण बहुजन समाजाला शिकवण देणें हेंच तिचे जीवितकार्य असतें तरी तिचा वैयक्तिक विकास इतक्या उच्च दर्जाला पोंचलेला असतो कीं, तिच्या काहीं कृति या तिच्या स्वतःच्या निराळ्या मापानेंच मोजाव्या लागतात. आणि खुद्द गांधींनींच म्हटल्याप्रमाणें आदर्श असा केवळ एक सत्याग्रहीहि आपल्या श्रद्धेनें प्रचंड शक्ति निर्माण करूं शकतो. गांधींना ते केवळ एक साधु आहेत; राजकारण त्यांना काहीं कळत नाहीं असें म्हणण्याची प्रथा काहीं दिवसापूर्वी पडली होती. पण आता तसें कोणीहि मानीत नाहीं. भारतीय संस्कृतीचें सर्वश्रेष्ठ स्वरूप या महापुरुषाच्या रूपानें एकत्र झालें आहे हें मान्य करूनहि, गांधी हे एक महान् मुत्सद्दी आहेत; ते जसे एक साधुपुरुष आहेत, त्याचप्रमाणे राजकारणातहि ते कुशल आणि चतुर आहेत याविषयीं कोणास शंका राहिलेली नाहीं. आधुनिक अगर सामान्यतः प्राचीन अशा कोणत्याहि सर्वसामान्य कल्पनाच्या चौकटींत ते बसत नाहींत. राजकारणी मुत्सद्दी कसा असतो अगर असला पाहिजे याविषयीं सर्वसामान्य ज्या

कल्पना अनादि कालापासून चालत आल्या आहेत त्यांनाच प्रमाण मानणा-र्यांना गांधी हें एक कोडें होऊन बसलें आहे. 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' ही राजकारणाचीच नेहमींची व्याख्या ! तथापि मनुष्याचा जसजसा विकास होत आहे आणि त्यानें परिश्रमानें संपादन केलेल्या ज्ञानदीपाच्या प्रकाशानें त्याचा पुढील मार्ग जसजसा जास्त जास्त स्पष्ट होत आहे तसतसे त्याच्या पुढें नवे नवे आदर्श निर्माण होत असतात आणि या आदर्शदीपानें पुढील हजारों वर्षांचा काल प्रकाशित होत असतो. अंधुक अशा मागील कालखंडावर दृष्टि न ठेवता उद्दीपित, प्रकाशमान, सुस्पष्ट अशा या भविष्य कालावर नजर ठेवूनच आपणास गांधींसारख्या महान् व्यक्तीच्या चरित्राकडे पहावयास पाहिजे. एखादी गोष्ट केवळ परंपरेनें चालत आली आहे म्हणूनच ती मानली पाहिजे हें जसें कोणताहि प्रामाणिक बुद्धिवादी मनुष्य आज मानूं शकणार नाहीं, त्याच-प्रमाणें कोणत्याहि आदर्शांच्या बाबतींतहि आपण समजावयास पाहिजे. अस्पृ-श्यतेबाबतच्या पूर्व कल्पना—निदान परंपरेनें आज हजारों वर्षें चालत आलेल्या—या अशा आज चूक मानल्या जाऊन नव्या स्वतंत्र कल्पनांचा उदय होत आहे त्याचप्रमाणें राजकारणाबद्दलहि नव्या मूल्यमापनाची निर्मिति होत आहे आणि तशी ती झाली पाहिजे.

लोकशाही, साम्यवाद या आधुनिक राजकारणविषयक कल्पनामुळें राष्ट्रां-तर्गत प्रश्न व आंतरराष्ट्रीय संबंध याची व्यवस्था एका निराळयाच तत्त्वावर लावण्याचा प्रयत्न चालू आहे. प्रत्येक राष्ट्र हें आता संपूर्णपणें स्वतंत्र असें राहिलें नसून आधुनिक शास्त्रीय शोधांनीं पृथ्वीच्या पाठीवरील सर्व राष्ट्रांचें परस्परावलंबित्व वाढविलें आहे. अशा परिस्थितींत राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहार सर्वस्वी निराळयाच पद्धतीनें चालणार आहेत यात शंका नाहीं आणि तसा तो न चालला तर सर्वांचाच नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं. सर्वांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें हे आंतरराष्ट्रीय संबंध ज्याच्या योगानें नियंत्रित केले जातील, असें एखादें विशाल तत्त्व शोधून काढण्याचा विचारवन्त लोकांचा प्रयत्न चालू आहे. गांधींनीं हें विशाल, सर्वव्यापी व परिणामकारक तत्त्व शोधून काढलें आहे. आणि त्याचा यशस्वी रीतीनें प्रत्यक्ष उपयोगहि ते करून दाखवीत आहेत. या सर्वस्वी अभिनव मंत्राच्या अभिनव प्रयोगाचें

शास्त्र आणि आचार तयार करण्याचें काम त्या मंत्राच्या द्रष्ट्या ऋषीकडे सोंपविलें पाहिजे

●

## १२-२-४३

आज अर्थात् पुन्हां गांधींच्या उपवासाविषयींच सर्वत्र चर्चा चालू आहे. राजकारणांत उपवासादि उपायांचा अवलंब करावा किंवा नाहीं या तात्विक चर्चेपेक्षां या उपवासकालाच्या मर्यादेंत काय काय घटना घडून येण्याचा संभव आहे या प्रश्नाकडेच सर्वांचें लक्ष लागलेलें दिसतें. त्याचप्रमाणें हे उपवासाचे दिवस गांधींना कसे काय जातील या बाबतींतहि तर्कवितर्क चालू आहेत. लढाईच्या ठरीव सांच्याच्या बातम्या ऐकून कंटाळलेले लोक आतां गांधींच्या उपवासाची व त्याबाबत घडणाऱ्या इतर घटनांची हकीकत वाचावयास उत्सुक झालेले दिसतात. राजाजी वगैरे मंडळी आतां महात्माजींना भेटावयास जातील व इतरहि राजकारणी पुढारी या संधीचा फायदा घेऊन हिंदु-मुसलमान एकी, राजकीय पेंचप्रसंग इत्यादि प्रश्नांची चर्चा करून राजकीय कोंडी फोडण्याचा प्रयत्न करतील अशी कांहीं जणांची आशा आहे. बंगालमधील मुस्लीम लीगचे पुढारी ख्वाजा नजिमुद्दीन यांच्या उद्‌गारांमुळें त्यांना विशेषच खात्री वाटत आहे. गांधी-व्हाइसराय पत्रव्यवहार हिंदुस्थानांत संपूर्णपणें प्रसिद्ध झाला नाहीं पण विलायतेंत मात्र तो प्रसिद्ध झाला. असा भेद कां ? आम्हांलाहि तो पत्रव्यवहार संपूर्ण स्वरूपांत मिळाला पाहिजे तरच जनतेचें समाधान होईल व जनतेला आपलें मत स्वतंत्रपणें बनवितां येईल असें 'मुंबई क्रॉनिकल' नें लिहिलें आहे. हिंदुस्थानांत कॉंग्रेसेतर पुढाऱ्यांच्या गांधींच्या उपवासाविषयीं गांठीभेटी-चर्चा चालू आहेत. त्यांचें इष्ट फल काय होतें पहावयाचें.

राजकारणांत उपवासाचा उपयोग करणें म्हणजे political black mail (राजकारणांतील धमकी) होय असें म्हणण्यांत आलें आहे. black mail (दरवडेखोरी) वर साम्राज्य चालविणाऱ्या ब्रिटिश सरकारच्या प्रतिनिधीनें

ही तक्रार करावी हें आश्चर्यजनक आहे. तथापि कोणीहि हा प्रश्न न टाळतां त्याची संपूर्णपणें चर्चा करणें जरूर आहे.

अहिंसेची टर उडविणारे लोक जेव्हां अमुक हिंसा आहे, अमुक कृत्यानें अहिंसा नाहींशी होते असें कृत्रिम गांभीर्यानें प्रतिपादूं लागतात तेव्हा मात्र हंसूंच येतें पण तें बाजूला ठेवलें तरी त्यांच्या म्हणण्यांत तथ्य आहे काय याचा विचार होणें अगत्याचें आहे. अर्थात् खुद्द गांधीच त्याचें चांगलें उत्तर देऊं शकतील. पण मला मात्र असें वाटते कीं, राजकारणांत अगर कोणत्याहि क्षेत्रांत आपल्या मताच्या प्रभावार्थ साधारणतः जीं साधनें वापरलीं जातात, त्या सर्वांपेक्षां आत्मशुद्धीचा हा उपवासाचा उपाय किती तरी श्रेष्ठ आहे. अर्थात् एवढेंच म्हटल्यानें त्याचें श्रेष्ठत्व निरपवाद सिद्ध होऊं शकत नाहीं हें मी जाणतों. जळगावचे श्री. देवकीनंदन म्हणाले कीं, 'या बाबतींत आपण खुद्द गांधींच्या तत्त्वज्ञानाकडे पाहिलें पाहिजे. म्हणजे त्यांच्या उपवासाबद्दल मत बनवावयाचें तें गांधींच्या दृष्टीनें विचार करून मगच बनवावयास पाहिजे.' महात्मा गांधींच्या मतें राजकारण हा मानवी जीवनांतील अगदीं सर्वस्वीं वेगळा पृथक् असा कांहीं विभाग नव्हे. मनुष्याचें सर्व जीवनच आध्यात्मिक (spiritual) आहे, तेव्हा राजकारणांत अध्यात्माला सोडून जगता येईल हें म्हणणें चूक आहे. राजकारणासारख्या विषयांत अध्यात्म घुसडावें लागत नाहीं, तें त्यात अंगभूतच आहे. फक्त तें त्यांतून ओळखून काढून विशुद्ध स्वरूपात जगापुढें मांडण्याचें काम गांधींनीं केलें आहे. असें असल्यामुळें राजकारण व अध्यात्म (spiritualism) यांची आपण करतों तशी फारकत गांधी करीत नाहींत. आणि असें झालें म्हणजे उपवासासारख्या आत्मशुद्धीच्या मार्गांचा अवलंब करणें चूक ठरत नाहीं. अर्थात् गुंतागुंतीच्या व महत्त्वाच्या शस्त्राचा ज्याप्रमाणें एखाद्या तज्ज्ञानेंच उपयोग करावयाचा असतो त्याप्रमाणेंच आत्मशुद्धीच्या व आत्मक्लेशाच्या मार्गांचा उपयोग त्यांतील मुरब्बी माणसानेंच करावयास पाहिजे.

आणि राजकारणांत आपणास हवें तें घडून यावें यासाठीं सामान्यतः आपण कोणत्या उपायांचा अवलंब करतों ? आपल्या मताचा अगर पक्षाचा विजय घडून यावा म्हणून कोणत्याहि सूक्तासूक्त उपायांचा अवलंब करण्यांत

येतो. प्रसंगविशेषीं केवळ शारीरिक बलाचा किंवा शस्त्रास्त्राचाहि उपयोग केला जातो. आपलें म्हणणें खरें आहे, हें प्रस्थापित करण्यासाठीं शस्त्रबलाचा उपयोग करणें यासारखी हास्यास्पद दुसरी गोष्ट नाहीं. तथापि तिचा राजरोस उपयोग केला जात आहे, आणि सर्व प्रकारच्या गुप्त कारवाया, कारस्थानें, घातपात या सर्वांना राजकारणांत मानाचें स्थान मिळालें आहे. जणूं काय राजकारण हें क्षेत्रच असें आहे कीं, त्यात मानव्य, संस्कृति, सदसद्विवेकबुद्धि या सर्वांचा होम करावा. ही कल्पनाच मुळीं असह्य आहे. पण नेमकी तीच कल्पना प्रतिष्ठेचें स्थान मिळवून बसली आहे. या असल्या गुप्त आणि घाकदपटशाच्या प्रकारापेक्षां सरळ सरळ आपलें म्हणणें जगापुढें मांडून आपल्या मताच्या पुष्टीकरणार्थ अगर सिद्धीकरितां आत्मक्लेशाचा शुद्ध उपाय योजणें यांत चूक कसली ! मात्र आपण, जगांतील आपल्या सर्व व्यवहाराकडे पाहण्याची दृष्टि बद-लली पाहिजे. म्हणजेच या उपायाच्या मार्गांतील रहस्य कळून येईल. आत्मक्लेश हा मार्ग एकदां मान्य केला म्हणजे मग पुढें त्याचा उपयोग केव्हां व कसा करावा व केव्हां त्याचा अवलंब केला असतां तो योग्य ठरेल या प्रश्नाचा आपोआप उलगडा होण्यासारखा आहे. मात्र त्यापूर्वी आत्मक्लेश हा एक श्रेष्ठ उपाय आहे ही मनोमनीं खात्री पटली पाहिजे आणि ही खात्री पटणें हें काम इतकें सोपें नाहीं. माझी या उपायावर श्रद्धा आहे पण बुद्धिवादानें ( rationally ) ती अजून व्हावी तितकी दृढ झालेली नाहीं. शिवाय आत्म-क्लेशाचा मार्ग सर्वश्रेष्ठ आहे असें निःशंक मनानें मानलें तरी व्यवहारतः तो यशस्वी होऊं शकेल किंवा नाहीं हा एक प्रश्न उपस्थित होतोच. गांधी-सारख्या कुशल व चतुर व्यक्तींच्या हातात हें साधन प्रभावी ठरलें आहे यांत शंका नाहीं आणि म्हणूनच एरवीं साशंक होऊं पाहणाऱ्या मनाला एकीकडे असाहि दृढ विश्वास वाटतो कीं, इतर शस्त्रांप्रमाणेंच या शस्त्राचा उपयोग करावयास शिकणें यासाठीं विशेष पात्रता अंगीं आणली पाहिजे आणि अशा सुपात्र व्यक्तींच्या हातांत हें शस्त्र इतर सर्व शस्त्रांपेक्षां अधिक प्रभावी व अधिक टिकाऊ असें आहे.

आज लहानसेच पण मनोरंजक असे दोन प्रश्न सहज चर्चेस निघाले. गांधींच्या उपवासाला सहानुभूति म्हणून जेलमधील आम्ही सर्व मंडळींनीहि

एक दिवस उपवास करावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें तो केलाहि. पण जेलकडून आम्हाला दररोजचा जो शिधा मिळतो, तो घ्यावयाचा किंवा नाहीं यावर थोडा वादविवाद झाला. नाशिकचे श्री गोविंदराव देशपांडे म्हणाले कीं, आपल्या या उपवासाला जसें एक आध्यात्मिक स्वरूप आहे त्याप्रमाणें त्याला एक राजकारणी अंगहि आहे. कारण गांधींना त्यांच्या उपवासांतून सुखरूपपणें पार पडतां यावें म्हणून प्रार्थनेच्या रूपानें ज्याप्रमाणें आपण हा उपवास करतों त्याचप्रमाणें त्यांनीं ज्या कारणांकरितां हा उपवास सुरू केला आहे 'त्या कारणांलाहि' आमचा पाठिंबा आहे हें सरकारला दाखविण्यासाठीं आपण आगाऊ सरकारला उपवासाचें कारण कळवावें व त्या दिवशींचा शिधा स्वीकारूं नये. यावर सिन्नरचे श्री. दुर्वे म्हणाले कीं, आपला आजचा हा उपवास, गांधींना त्यांच्या उपवासांत यश मिळावें व त्यांच्या तपस्येंत कोणत्याहि प्रकारचें विघ्न येऊं नये याच केवळ आध्यात्मिक व नैतिक भावनेनें केला आहे. ही भावना विशुद्ध स्वरूपांत आपल्या सर्वांच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावी यासाठीं आपण निराहार राहणें युक्त समजतों. उपवासानें आपलें शरीर व त्याबरोबरच मन शुद्ध राहतें. पण म्हणून नेहमींचा शिधा घेऊन ठेवावयास कांहींच हरकत नाहीं. आपला प्रश्न फक्त कांहीं काळ मूक प्रार्थनेंत घालवावयाचा असा आहे, राजकारणी झगडा लढवावयाचा नाहीं.

हा प्रश्न शेवटीं अनिर्णीतच राहिला.

*    *    *    *    *

गांधींना सूत कातणें हें अत्यंत प्रिय आहे. म्हणून आम्हीहि सर्वांनीं आळीपाळीनें पण दिवसभर चरखा चालविण्याचें ठरविलें. गांधींचा उपवास सुटेपर्यंत हा चरखा चालू राहावयाचा आहे. आज मी कातावयास बसलों तेव्हां इतरहि कांहीं मंडळी हजर होतीच. मी म्हटलें, 'जर चांगलें सूत काढावयाचें असेल तर साधनें चांगलीं पाहिजेत आणि त्यासाठीं चांगले पेळू पाहिजेत आणि चांगले पेळू पुरवावयाचे हें काम चरखा संघासारख्या संस्थेचें आहे. माझ्या हातांतील कचऱ्यानें भरलेल्या गचाळ पेळूकडे पाहूनच मी हे उद्गार

काढले होते. अर्थात् मला ठरीव साच्याचेंच उत्तर देण्यात आलें. 'सूत काढण्याचें शास्त्र असें आहे कीं, प्रत्येकानें स्वतः आपापले पेळू तयार करून घेतले पाहिजेत,' असें सर्वांनीं सांगितलें. मी म्हटलें, 'मला हें मान्य नाहीं. आम्ही सूत काढावयाचें मान्य केलें, किंवा आवडीनें काढूं लागलों म्हणून पहिल्यापासून शेवटपर्यंत सर्व क्रिया आम्हींच करायला पाहिजेत हा आग्रह का ? चरखा चांगला ठेवणें, तो सुस्थितींत राखणें ही जबाबदारी अर्थात् आमच्यावर आहे. पण वेळोवेळीं लागणारे पेळू चांगल्या प्रकारचे पुरविणें हें एखाद्या संस्थेचें काम नाहीं का ? मध्यम वर्गांतील निरनिराळ्या व्यवसायांत गुंतलेल्या माणसांनीं पेळू तयार करावयाच्या कामांत आपला वेळ घालवावा असें मला वाटत नाहीं. सूत तरी आम्ही कां काढतो ? त्याचें आर्थिक महत्त्व आम्हांला थोडेंबहुत आहे, पण वकिली-डॉक्टरीसारखा धंदा करून आम्ही जी कमाई करूं शकतों, तिच्या दृष्टीनें विचार केल्यास सूत काढून आम्ही कांहीं फारशी बचत करूं शकतो असें नाहीं. तथापि सूत काढणें हें आज राष्ट्राच्या स्वाभिमानाचें, राष्ट्रांतील अभिन्न भावनाचें एक प्रतीक आहे या दृष्टीनेंच आम्ही मध्यमवर्गीय लोक तरी सूत काढतो. सूत काढण्यांत कांहीं कमीपणा नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांत एक विशेष प्रतिष्ठा आहे, त्यात आमच्या स्वाभिमानी वृत्तीचा आविर्भाव आहे. आणि आमच्या स्वदेशी भावनेचें तें एक व्यक्त स्वरूप आहे हीहि जाणीव आम्हांला सूत काढतांना असते. हिंदुस्तानांतील बहुजनसमाज शेतीवर अवलंबून आहे सूत कातणें हा त्याचा मुख्य पोटधंदा आहे आणि तो नष्ट झाल्यामुळें त्याला आर्थिक अवनति आली ही गोष्ट आम्ही जाणतों आणि जरी आम्ही मध्यमवर्गीय मूठभरच असलों तरी शेतकऱ्याच्या या मूळ आयुष्यक्रमाकडे आत्मीयतेच्या भावनेनें पाहणें आम्हाला जरूर वाटतें. आणि असें करण्यांत तिऱ्हाईत म्हणून त्याच्याकडे patronising (आश्रय [illegible]) या दृष्टीनें न पाहता त्याचा व आपला प्रश्न एकच आहे किंबहुना आपण त्याच्यावर अवलंबून आहों, आपण सर्वांनीं एकमेकांत मिसळून एकरूप होऊनच स्वातंत्र्याचा प्रश्न सोडविला पाहिजे ही आमची भावना आहे म्हणूनच आम्ही सूत काढतों आणि त्यांत आम्हांला आनंद वाटतो. आम्ही नियमित

सूत कातावें अशी आपलीहि इच्छा आहे. असें आहे तर चांगले पेळू पुरविणें हें चरखासंघाचें काम आहे. लोकांना चांगलीं साधनें पुरविणें हे अत्यंत जरुरीचे असतें. त्यांना एखाद्या कार्याबद्दल तळमळ आहे किंवा काय हें पाहणें मनोरंजक असलें तरी फलप्रद खास नसतें. तेव्हां त्याची कसोटी पाहण्यापेक्षां त्यांना सुलभता उत्पन्न करून देणें हें काम अधिक महत्त्वाचे आहे. कोणाकडूनहि फार कडक अशी अपेक्षा ठेवूं नये. त्या दृष्टीनें चांगले पेळू तयार करण्याचे काम प्रत्येक व्यक्तीवर न टाकता एखाद्या संस्थेनेंच हे काम आपणाकडे घ्यावें म्हणजे सर्वांना प्रिय असा या कार्याचा चांगला प्रसार होईल. श्रमविभागाचे तत्त्व याचकरिता अमलांत आणावयाचें. पहिल्यापासून शेवटपर्यंत सर्व क्रिया एकालाच करावयास लावण्याचा आग्रह धरल्यानें कार्याचा नाश होतो. श्रमविभाग पाहिजे. अर्थात् ज्याला हौस आणि वेळ असेल त्यानें खुशाल सर्व क्रियाप्रक्रिया आपल्या हातानें कराव्या पण सर्वसामान्य धोरण म्हणून त्याचा अवलंब करण्यांत येऊं नये.

हीं विधानें सर्व लहानमोठ्या प्रश्नांबाबत लागू आहेत.

*  *  *  *

महात्मा गांधींना त्यांच्या या उपवासमय्री दिव्य तपस्येंत संपूर्ण यश मिळावें म्हणून सायंकाळीं आम्ही सामुदायिक प्रार्थना करितों. आज सुमारें पांचशें मंडळींनीं एकत्र बसून गंभीरपणें जी धार्मिक प्रार्थना केली तिचें दृश्य खरोखरच अन्तःस्पर्शी होतें. संघमानस ( community mind ) ही एक जबरदस्त शक्ति आहे. जुन्या धार्मिक कल्पनांवर विश्वास नसला तरी सर्वांचीं हृदयें एक करून एकच सदिच्छा व्यक्त करण्यानें एक प्रचंड शक्ति निर्माण होते यांत शंका नाहीं. मुसलमान सद्गृहस्थांनीं कुराणांतील वचनें म्हटलीं, आणि 'रघुपति राघव राजाराम'च्या जयघोषांतहि त्यांनीं मनःपूर्वक भाग घेतला ही गोष्ट सूचक नाहीं काय ?

संध्याकाळीं सुमारें ७॥ वाजतां खोल्याबाहेरील पटांगणांत कांहीं मित्रांशीं बोलत उभा होतों. इतक्यांत ईशान्य दिशेला एक मोठा तारा तुटून पडतांना आम्ही पाहिला. एखाद्या टेनिसच्या चेंडूएवढा त्याचा आकार होता आणि

रंग निळसर हिरवा होता. संधिसमयाच्या मंदप्रकाशातहि त्याचें तेज सर्वत्र भासलें एवढा मोठा तारा तुटतांना मी आजपर्यंत कधींच पाहिला नव्हता. मला मौज याची वाटली कीं, तारा तुटतो म्हणजे काय होतें याची माहिती नसते त्यांना आकाशातील एखादी तारकाच खरोखर तुटल्याप्रमाणें वाटतें. विश्वाच्या अनंतत्वाविषयीं आणि विविधत्वाविषयीं त्याना कल्पनाच नाहीं. कोणी अभ्यास करीत नाहींत त्याना ती जिज्ञासाच नाहीं हें त्याचें खरें कारण आहे. मनुष्याला प्रत्येक बाबतींत तीव्र जिज्ञासा पाहिजे

●

## १३–२–४३

गांधींची प्रकृति काहींशी बिघडली असल्याचें वर्तमानपत्रातून वाचल्यामुळें लोकाना काळजी वाटत आहे. काहीं लोकांचें तर आपल्या नेहमींच्या कामाकडे लक्षच लागत नाहींसें झालें आहे. प्रत्येक खोलींत चर्चा चालली आहे. उपवासाचा परिणाम कोणावर कसा होईल याबद्दल, अनेक तर्क करण्यात येत आहेत. एकंदरींत आतापर्यंत वातावरण जें कुंद होतें त्यात कांहींतरी खळबळ होणार हें खास. पण ती हिंदुस्थानला उपकारक होईल किंवा अपकारक होईल हें सांगता येणे मात्र कठीण आहे !

आज सहज एक जुनें वर्तमानपत्र चाळीत होतों तर त्यात फ्लॉरेन्स नाइटिंगेलच्या लंडनमधील भव्य पुतळयाचें छायाचित्र व एक छोटासा लेख आढळला. मनुष्यजातीवर उपकार करणाऱ्या एका थोर व्यक्तीचें त्यामुळें आज पुनः स्मरण झालें आणि तें तशाच एका थोर महात्म्याच्या दिव्य तपस्येच्या सुगंधानें भरलेल्या वातावरणात झालें हा विशेष योगायोग होय. या थोर बाईचें नांव सर्वांनीं ऐकलें आहे पण तिच्या आयुष्यक्रमाची फारशी माहिती कोणास असेलसें वाटत नाहीं. तिचें चरित्र वाचलें म्हणजे ती एक असामान्य स्त्री होती हें पटतें.

आज रुग्णपरिचारिकाना ( nurses ) आपलें काम किती स्वच्छतापूर्वक व दक्षतेनें करावें लागतें हें आपण पाहतों. रोग्यांची विशिष्ट मनःस्थिति लक्षात

घेऊन त्यांच्याशीं प्रेमळपणानें वागून त्याना योग्य ते उपचार करणें हें काम मोठें कौशल्याचें आणि धीराचें आहे. असा अनुभव आहे कीं, निसर्गतःच या कामाला पुरुषापेक्षा स्त्रिया अधिक लायक आहेत. आजच्या एखाद्या चांगल्या इस्पितळांत गेलें कीं, जिकडे तिकडे टापटीप, स्वच्छता आणि नियमितपणा यांचेंच साम्राज्य पसरलेलें दिसतें. त्यामुळें केवळ १०० वर्षांपूर्वीच रुग्णालयें अत्यंत गलिच्छ असत आणि त्यात परिचारिकेचें काम करणाऱ्या स्त्रिया ह्या अत्यंत घाणेरड्या, व्यसनी असत हें सांगितलें तर कोणांस एकदम पटण्यासारखें नाहीं. इंग्लंडमध्यें व युरोपमध्येंहि सामान्यतःवाईट चालीच्या, दारुड्या, अशिक्षित, घाणेरड्या स्त्रियाचा धंदा म्हणूनच परिचारिकाच्या धंद्याची ख्याति होती. अर्थात् त्याचा पगार सुद्धा एखाद्या घरातल्या अगर शेतीवर काम करणाऱ्या मजुराइतकाच असे. एकंदर रुग्णालयाची व्यवस्थाच त्यावेळीं कशी असेल हें यावरून समजून येण्यासारखें आहे. नाइटिंगेलनें या वातावरणात क्रांति केली आणि जगातील आजच्या रुग्णालयाची अप्रतिम स्वच्छता व व्यवस्था ही मुख्यतः तिच्याच परिश्रमाचें फळ होय. वास्तविक स्वतः ती सुशिक्षित होती, संपन्न होती आणि तिला जगात कशाची काळजी करण्याचें कारण नव्हतें. पण मनुष्यजातीची सेवा करण्याची तीव्र तळमळ तिच्या हृदयात होती तीं काहीं तिला स्वस्थ बसूं देईना आणि हर तऱ्हेनें प्रयत्न करून तिनें जर्मनींत कैसरवर्थ येथें परिचर्येचें शिक्षण देणारी एक संस्था होती तेथें जाऊन शिक्षण घेतलें, युरोपात तर प्रवास केलाच पण ईजिप्तमध्येंहि ती गेली होती. तिनें आपलें शिक्षण किती आस्थेनें आणि निश्चयानें केलें हें पाहिलें म्हणजे तिच्याविषयीं अतिशय आदर वाटूं लागतो. क्रीमियाच्या लढाईत जखमी झालेल्या सैनिकाना स्कुटारी येथील एका जुन्या वाड्यात ठेवण्यात येत असे. या वाड्याची एक एक बाजू दोन दोन फर्लांग लांब होती आणि एकंदर परिघ ४ मैलाचा होता. या जुनाट इमारतींत सैनिकाना आणून टाकण्यात येत असे एवढेंच. पण त्यांच्या जखमा धुतल्या जात नसत आणि त्यांवर औषधोपचार करणें तर दूरच राहिलें. सर्वत्र धूळ पसरली होती. उंदीर आणि किडे हे तेथील मालकपद बळकावून बसले होते. अशा सर्वस्वी निराशामय परिस्थितींत या धाडशी स्त्रीनें

आधुनिक जगातील एका अत्युपयुक्त आणि क्रांतिकारक कार्यास उज्ज्वल स्वरूप प्राप्त करून दिलें. प्रथम प्रथम तिला लागणारा व परिचर्येच्या सामानाचा खर्च तिनें व तिच्या मित्रानीं केला. अधिकाऱ्यांच्या अडथळ्यांना तिनें जुमानलें नाहीं. विशेष म्हणजे सैनिकांना मानसिक स्वास्थ्य व आनंद मिळावा म्हणून तिने त्याना खेळ, पुस्तकें इत्यादिकाची व्यवस्था करून दिली. या कामात तिची प्रकृति कायमची बिघडली. इंग्लंडला परत आल्यावर तिचें कौतुक झालें ही गोष्ट वेगळी. पण त्यानंतर तिनें परिचर्येचें एक नवें शास्त्रच निर्माण केलें आणि आमरणान्त त्याची वाढ व जोपासना करण्यातच तिनें आपलें सर्वस्व खर्च केलें.

एखादी मधुर तान ऐकली म्हणजे उन्मादानें आपलें मस्तक भरून जातें आणि त्या उन्मादावस्थेचा भंग करणारी कोणतीहि गोष्ट आपणास आवडत नाहीं. पोटभर जेवल्यानंतर ज्याप्रमाणे अन्नाचा एक घांसहि पोटांत ढकलणें शक्य नसतें त्याप्रमाणेंच कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्याचें एकदा सेवन केल्यावर, त्या सेवनानें उत्पन्न केलेल्या आनंदमय, उन्मादकारक अवस्थेंतच गुंगून रहावेंसें वाटतें. **कविवर्य रवींद्रनाथांच्या** कित्येक काव्यांचें असेंच आहे. कांहीं वेळां त्यांची एखादी कविता वाचली कीं, मस्तक मारून गेल्याप्रमाणें होतें. आपण या सुखदुःखमिश्रित मर्त्य पृथ्वीतलावर नसून आनंदाचें साम्राज्य भरून राहिलेल्या दिव्य प्रकाशमान् वातावरणात पोहत आहोंत, मनसोक्त डुंबत आहोंत असें वाटूं लागतें आणि या समाधिसुखाचा भंग कशानेंहि होऊं नये अशी तीव्र भावना आपल्या हृदयात उत्पन्न होते. त्या एकाच काव्यात इतका रस, माधुर्य आणि इतकी मादकता भरलेली असते कीं आपले हृदय भरभरून वाहूं लागतें, ओसडूं लागतें आणि दुसऱ्या कोणत्याही गोष्टीला तेथें जागाच राहात नाहीं. टागोरांचीं अशीं पुष्कळ काव्यें आहेत कीं, तीं एक, दोन अगर फार तर तीन पेक्षा जास्त एका वेळीं वाचवतच नाहींत. फ्लॉरेन्स नाइटिंगेल हिच्या चरित्राचें असेंच आहे. मला पक्कें स्मरतें कीं, मागें एकदां तिचें चरित्र वाचल्यावर कांहीं काळ मी डोळे मिटून अगदीं स्वस्थ पडून राहिलों होतों. आणखी कांहीं पुढें वाचण्याची अगर करण्याची मला इच्छाच झाली नाहीं.

शक्यच नव्हतें. अमृताचा प्याला प्याल्यावर त्याची आठवण कोण विसरेल ? माझ्या मनांत कोणते विचार चालले होते हें मला सांगता यावयाचें नाहीं. असे म्हटलें तर कांहीं विचारच मनांत नव्हते. तिच्या चरित्राच्या सुगंधित वातावरणात कांहीं काळ माझीं गात्रें बधिर होऊन गेलीं आहेत असेंच मला भासलें. केवळ बुद्धिगम्य गोष्टींनीं हा अनुभव येणें शक्य नसतें. हृदयाची अगदीं आतली तार छेडण्याचें सामर्थ्य तिच्या चरित्रांत आहे म्हणूनच हा या जगांत एरवीं विरळा असणारा अनुभव मला येऊं शकला. गांधींच्या कित्येक लेखांनींहि अशीच भावनोत्कटता निर्माण होते. त्याचे कांहीं लेख मग्ंध वाचवतच नाहींत ! सुंदर सुंदर, अर्थपूर्ण वाक्यांच्या खरणींत ते कांहीं वेळा असें एखादें बिनमोल वाक्य फेंकून देतात कीं, मगोदरच क्रमाक्रमानें धुंद होत चाललेल्या मनाला पुढें वाचणें अशक्य होऊन बसतें. इतकें अचूक, इतकें सत्य, इतकें सुंदर, इतकें रसपूर्ण वाक्य ते लेहूं शकतात तरी कसें याचें मला नेहमी आश्चर्य वाटतें ! एडवर्ड थॉमसन या प्रसिद्ध इंग्रज लेखकानें असें लिहिलें आहे कीं, गांधी आपल्या विषयाशीं इतके तादात्म्य पावलेले असतात कीं, त्यांच्या लेखणींतून झरणारीं वाक्यें आणि मुखांतून स्रवणारे शब्द हे नेहमी अचूकच असतात. आणि त्यामुळेंच ते इंग्रजी भाषेंत इतकें चांगलें लिहूं शकतात.

* * * *

परिचारिकेच्या धंद्यावरून आज मला सहज एक गोष्ट आठवली. मी डॉक्टरीची परीक्षा पास झाल्यावर houseman (गृहाधिकारी) म्हणून कांहीं दिवस हॉस्पिटलमध्ये काम करीत होतों. त्या वेळीं एका अंग्लो-इंडियन नर्सेनें मला हंसत हंसत आपली एक गोष्ट सांगितली. ती नुकतीच शिक्षणासाठीं हॉस्पिटलमध्यें येऊन दाखल झाली होती. लवकरच तिला एकदा रात्रपाळी करण्याची पाळी आली. रात्रीं काय काय करावयाचें, कोणाचा ताप पहावयाचा, कोणत्या रोग्याची नाडी काळजीपूर्वक पाहून टिपून ठेवावयाची, कोणाला औषध द्यावयाचें याबद्दल सर्व सूचना सिस्टर सायंकाळीं कामावरून परत जातांना रात्रपाळीच्या नर्सला देत असते आणि एका वहींत सर्व सूचना

लिहूनहि ठेवते. या नर्सची ती पहिलीच रात्रपाळी होती, तिला सिस्टरनें सर्व सूचना समजावून दिल्या व जाता जाता सांगितलें, ' हें पहा मिस XXX त्या कपाटांत कॉफीची पूड आणि साखर आहे. कोणाला कॉफी लागल्यास ती करून दे ' सिस्टर निघून गेली, थोडया वेळानें चांगली रात्र झाली आणि या नर्सला सिस्टरनें सांगितलेल्या कॉफीची आठवण झाली. ती आपल्या खुर्चीवरून उठली आणि एका रोग्याकडे गेली. मृदु स्वरात तिनं विचारलें, ' तुला कॉफी पाहिजे ? ' रोगी आनंदानें म्हणाला, ' हो ! ' तिनें हातातलं काम बाजूला ठेवलें, आणि त्याला छान कॉफी करून दिली. रोग्यानें तिला धन्यवाद दिले. तिलाही बरें वाटलें. आणि ती पुन्हा टेबलाशी येऊन बसली पण काहीं वेळाने पुन्हा तिला वाटलें कीं, आणखी कोणाला कॉफी हवी असली तर ? पुन्हा ती दुसऱ्या एका रोग्याजवळ गेली व त्यालाहि तिनें तोच प्रश्न विचारला. त्यालाहि तिनें कॉफी करून दिली. कॉफी पिऊन रोग्यानें समाधानाचा उद्गार काढला कीं, तिलाहि बरें वाटे. लोकांची सेवा केल्याचें आंतरिक समाधान तिला मिळालें. झालें ! हाच तिचा क्रम सुरू झाला. कोणी झोपलेले असत ते थोड्या वेळानें जागे झाले कीं, ही त्यांना जाऊन विचारी, ' कॉफी पाहिजे ? ' ' नाहीं ' कोण कशाला म्हणतो ? आणि तिचें हें कॉफीदानसत्र पाहून हळूहळू इतरांनीं न विचारताहि आपणाला कॉफी पाहिजे असल्याची इच्छा प्रदर्शित केली. मग काय ? रात्रभर हाच प्रकार चालू राहिला ! ताप पाहणें, नाडी मोजणें, औषधें देणें, अंघोळ घालणे इत्यादि कार्यक्रम बहुधा अर्धवटच राहून गेले. सकाळीं सिस्टर आल्यावर तिला रात्रींच्या टिपणाची माहिती द्यावी लागते. सिस्टर पाहते तों कशाचाच कोठें पत्ता नाहीं. तिनें विचारलें, ' नर्स हें काय ? तूं त्या रोग्याचा ताप पुन्हां का पाहिला नाहींस ? आणि दुसरेहि काहीं तूं येथें लिहून ठेवलें नाहींस. आणि हें काय, अग ! या बाटल्यांतलीं औषधें अशीच्या तशींच आहेत कीं ! म्हणजे तूं रात्रीं निजली होतीस वाटतें ! ' नर्स गांगरली, म्याली ! तिनें अडखळत अडखळत रात्रींचा सारा प्रकार सिस्टरला सांगितला. सिस्टरला हंसावें कीं रागवावें हेंच कळेना. नर्स म्हणाली, ' तुम्ही सांगितलें होतें कीं, कुणाला कॉफी हवी असेल तर करून दे. मी सगळ्यांना



विचारलें तर प्रत्येकाने सांगितले कीं, मला हवी आहे. मग दिली नाहीं तर-तुम्ही रागवाल म्हणून सगळ्यांना ते मागतील त्यावेळीं कॉफी करून दिली!' सिस्टर समजली, मनांत हंसली आणि तिनें नर्सला न रागावतां तिचें काम समजावून दिलें.

## १४–२–४३

डॉ. भास्कर पटेल हे सध्या आम्हाला वैद्यकीय विषय शिकवितात. कल्याणचे डॉ. फडके यांच्या खोलींत आमचा वर्ग भरतो. अगदीं सरळ वर्गच आहे! फळा, खडूसुद्धा आहे. कारण डॉ. भास्कर याना फळ्यावर आकृति काढून आणि मुद्दे मांडून शिकविण्याची आवड आहे. आमच्या 'वर्गांत' ६-७ डॉक्टर येतात वसईचे म्हाठ र्षांचे डॉ. गाळवणकरहि येतात. त्याचा भव्य चेहरा केव्हांहि आदरच निर्माण करतो. बदलापूरचे डॉ. ओक, शेदुर्णीचे डॉ. साने, कल्याणचे डॉ. फडके, नाशिकचे डॉ. खाडिलकर हेहि नियमित हजर राहतात. अलीकडे अहमदाबादचे प्रसिद्ध वैद्य बापालाल वर्गाला येत असतात. डॉ. पटेल आम्हाला शिकवितात पण मधून मधून आमच्यापैकीं कोणी आपापले मनोरंजक अनुभवहि सांगतात आणि मग चर्चेला सुरुवात होते डॉ. भास्कर याना इंग्रजी उत्तम बोलता येतें आणि त्याना वैद्यकीय विषय फार आवडतो. डॉक्टर लोकांनीं वैद्यकीय पुस्तके वाचलीं पाहिजेत असा त्यांचा आग्रह असतो. ते स्वतः नेहमीं वाचीत असतात आणि त्याना शिकविण्याचीहि आवड आहे त्यांच्या-सारख्या विद्वान् डॉक्टरापासून ज्ञान मिळविण्याची संधि आम्ही का गमवावी? त्यांच्या वर्गात आम्हाला पुष्कळ नवीन नवीन गोष्टी कळतात आणि पुष्कळ जुन्या कोड्याचा उलगडा होतो. विद्यार्थीदशेंत काहीं गोष्टींचे रहस्य चांगलेंसें समजलेलें नसते, शिवाय अभ्यास करताना व्यवहारात कोणते विषय महत्त्वाचे आणि नेहमी उपयोगी पडणारे असतात आणि कोणत्या गोष्टींचा विशेष अभ्यास करावयास पाहिजे, याचे सूक्ष्म ज्ञान फारसें

नसते. त्या वेळीं फक्त परीक्षेच्या दृष्टीनें अभ्यास करण्यात येतो. पण कांहीं वर्षे प्रॅक्टिस केल्यानंतर आपोआपच सर्व गोष्टींचा उलगडा होतो. त्यामुळें यानंतरच्या काळात कोणी पुनः आपल्या ज्ञानाची उजळणी करूं लागल्यास त्याला त्याचा फारच फायदा होतो. माझ्या मतें एखाद्याला परदेशीं जाऊन जास्त शिकण्याची इच्छा असल्यास त्यानें डॉक्टरची परीक्षा पास झाल्यानंतर कांहीं वर्षे येथेंच प्रॅक्टिस अगर नोकरी करावी, आणि मग कोठें जावयाचें तेथे जावें. कारण मग अशा पक्व परिस्थितींत जे जें पहावयास मिळेल आणि ऐकावयास सापडेल त्याचें विशिष्ट महत्त्व ताबडतोब कळण्याची पात्रता अंगीं येते पण अर्थात् सर्वांनाच एकदा कोठें तरी प्रॅक्टिस सुरू केल्यावर अगर नोकरी धरल्यावर तिच्यात खंड पाडून दुसरीकडे ज्ञानार्जनार्थ जाणे शक्य असत नाहीं ही गोष्ट वेगळी !

बोलता बोलता डॉ. पटेल आम्हाला आपले बरेच अनुभव सांगतात. ते मोठे मनोरंजक आणि उद्बोधक असतात. इंग्लंडमधील आपले अनुभव सांगत असताना ते एकदा म्हणाले, ' तिकडे general practitioners करितां लहान लहान शिक्षणवर्ग अगर उजळणीवर्ग याची फार चांगली व्यवस्था असते. दोन दोन दिवसांचे लहान शिक्षणवर्ग सुद्धा असतात. ह्या दोन दिवसांत ठरलेल्या रोगाचें अगर विषयाचें संपूर्ण शिक्षण पद्धतशीरपणें मिळतें. पुष्कळ गोष्टी कळतात आणि जुन्याची उजळणी होते. एक्स रे, सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पहावयाच्या कांचेच्या slides (स्लाइड्स्) सगळें कांहीं तयार असतें. ज्याला ज्या विषयाची जरूर असेल, त्या विषयाची जरूर असलेली फी दिली कीं त्याला त्या विषयाचीं व्याख्यानें, प्रात्यक्षिकें सगळें कांहीं पहावयास, ऐकावयास मिळतें, त्यामुळें ज्ञान नेहमीं ताजें राहतें.

अशी व्यवस्था येथें कां नाहीं हें कळत नाहीं. तसें मुंबईला ' सूतिकाशास्त्र ' किंवा ' क्षय ' यांवर लहान लहान शिक्षणवर्ग मधून मधून भरवितात. पण सर्वसाधारणत. सर्व जनरल प्रॅक्टिशनरांना उपयोगी पडेल अशी योजना नाहीं. त्यामुळें आम्हा लोकांचें ज्ञान नेहमीं ताजें राहावयास पाहिजे तें राहत नाहीं. आमच्यापैकीं कित्येकजण वैद्यकीय विषयाचीं नियतकालिके ( medical magazines ) मागवितात. पण बहुतेक डॉक्टर लोक

आपल्या एकदा मिळविलेल्या ज्ञानावर आणि वेळोवेळीं औषधें तयार करणाऱ्या कंपनीनें आपल्या औषधांवरोबर छापले या पत्रकावरच भागवितात असें मला वाटतें. अर्थात् मला जी माहिती आहे त्यावरून मी असें म्हणतों. कदाचित् कांहीं ठिकाणीं निराळी परिस्थितीहि असूं शकेल, खेड्यांचें राहो पण मोठ्या शहरांत Medical Unions असतात. या युनियनमार्फत चांगल्या ताज्या पुस्तकांचा संग्रह करणें आणि चांगलीं नियतकालिकें मागविणें व त्यांचा उपयोग युनियनच्या सभासदांनीं करून घेणें असें कां आढळून येऊं नये! कांहीं युनियनमार्फत अशी व्यवस्था केली जाते आणि सभासद जिज्ञासू असेल तर त्याला चांगला फायदा मिळतोहि. पण बहुतेक ठिकाणीं युनियन म्हणजे वरिष्ठांपर्यंत दिवसातून त्यांच्याशी डॉक्टरांना एकत्र करणारी एक संस्था याखेरीज दुसरा कांहीं अर्थ नसतो अर्थात् असें संमेलनहि भरलें जावें, ही युक्त गोष्ट आहे हें चांगळें.

मला याबाबत अमळनेरचे डॉ. म्हसकर यांचें मोठें कौतुक वाटतें. ते साधे M. B. B. S. आहेत. कुठलीहि परदेशी पदवी त्यांनीं मिळविण्याचा प्रयत्न केला नाहीं. पण मला वाटतें, त्यांचे आहे एवढ्या मोठ्या प्रमाणावर खासगी हॉस्पिटल ठेवणारे मुंबई इलाख्यात तरी ते एकटेच आहेत. अर्थात् पुणें आणि मुंबई येथे मोठ्या मोठ्या पदव्या घेऊन आलेल्या डॉक्टरांनी चालविलेल्या इस्पितळाची गोष्ट वेगळी! कारण साधी एम. बी. बी. एस् डिग्री मिळविणारानें असें साहस आणि तेंहि चांगलें यशस्वी करणें हें खरेंच अभिनंदनीय आहे. लोकांचा आपल्यावर विश्वास बसला पाहिजे इतकें कौशल्य दाखविल्याशिवाय हें साहस शक्यच नाहीं. डॉ. म्हसकर कोणतेंहि ऑपरेशन करतात. अमुक एक ऑपरेशन त्यांना येत नाहीं असें नाहीं. कुशल शस्त्रवैद्याप्रमाणेंच ते कुशल वैद्यहि (physician) आहेत. त्यांची औषधी योजना (prescriptions) फार मोठी असत नाही, पण अचूक असते. कारण त्यांचें निदान (diagnosis) सहसा चुकत नाहीं. आणि early diagnosis and prompt treatment (प्रथमावस्थेंतील निदान व तावडतोबीची औषध योजना) हें तर वैद्यकीय व्यवसायातील मुख्य सूत्र आहे. डॉ. म्हसकर यांच्याजवळ अगदीं आधुनिक पुस्तकांचा संग्रह असतो. ताजीं

मासिकें ते मागवितात, वाचतात आणि कुठें काहीं नवीन आढळलें कीं, त्याचा प्रयोग करण्याची त्यांची तयारी असते. त्यांनीं 'एक्स् रे'चे स्वतःचें यंत्र ठेविलें आहे. अमळनेर हें तालुक्याचेंच(पण बरेंच मोठें) गांव आहे पण तें दूर-दूरच्या रोग्याना आपल्याकडे खेंचून घेतें याचें कारण डॉ. म्हसकराची आपल्या धंद्यातील कुशलता. त्यांनीं आपल्या स्वतःच्या अनुभवानें कांहीं medical wisdoms ( वैद्यकीय ठोकताळे ) बसविलीं आहेत. तीं ऐकायला मोठी गंमत वाटते. या वयातहि त्याचा उत्साह दांडगा आहे.

**डॉ. पटेल** यानीं एकदा सांगितलें कीं, तिकडे ( युरोपात ) कोणाचेंहि आयुष्य फुकट जाऊं नये याबद्दल फार दक्षता घेण्यात येते. प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं काही विशिष्ट गुण असतात आणि काहीं दोषहि असतात. त्या गुणांचा उपयोग व्हावा अशी योजना करण्यात येते. आंधळे, लंगडे, पंगु यानाहि आयुष्य भारभूत होऊं नये अशी काळजी घेण्यात येते. त्यांचा राष्ट्राला उपयोग होईल असेंहि करतात. आणि आपल्याकडे पहा ! राष्ट्रांतील केवढी शक्ति फुकट चालली आहे. आंधळे, पंगु याचें तर राहोच पण चांगल्या धडधाकट, बुद्धिमान् माणसाची तरी शक्ति फुकट जाणार नाहीं अशी काळजी येथें कोणी तरी करतें का ? सरकार तर बोलून चालून परकीय आहे पण आपण स्वतः याबाबत काय करतों ? पौर्णिमेच्या चांदण्याप्रमाणें आपल्या राष्ट्रांतील शक्ति सारी फुकट जात आहे. व्यक्ति तर काय पण समाजच्या समाज नाश पावले तरीं कुणाचें काय जाणार आहे ? शक्तीचा केवढा हा ऱ्हास आणि केवढी ही उधळपट्टी ! धडधाकट अंगाचीं आणि बुद्धिमान् माणसें ध्येयशून्य, आनंदविहीन, निरुपयोगी आयुष्य घालवितांना पाहिलें कीं, हृदय अगदीं फाटून जातें ! ते काय करणार बिचारे ! त्याचें महत्त्व ओळखून त्याचा योग्य उपयोग करून घेणारी योजनाच जेथें नाहीं तेथें त्याना दोष देण्यात काय अर्थ आहे ? युरोपमध्यें—विशेषतः पुढार-लेल्या देशात—प्रत्येक व्यक्तीला जास्तींत जास्त सुख कसें मिळेल याची व्यवस्था आणि काळजी वाहिली जाते. त्याचप्रमाणें निकामी, निरुपयोगी असा कोणताच मनुष्य असत नाहीं असें मानण्यात येतें. मनुष्याच्या अंगीं काहीं शारीरिक अगर मानसिक दोष असल्यास ते शक्य तितके सुधारण्याचा

प्रयत्न करण्यांत येतो आणि त्यांच्या गुणांना वाव मिळेल अशी व्यवस्था करण्यांत येते.

●

## १६–२–४३

गांधींची प्रकृति जरा जास्त बिघडली असल्याचें वर्तमानपत्रांत वाचलें. आमची काळजी सारखी वाढतच आहे. इतर सर्व विचार बाजूस राहून सर्वांच्या मनांत त्यांच्या प्रकृतीचाच विचार चालू आहे. त्यांचें वय आतां ७४ वर्षांचें. ५० वर्षांहून अधिक काळ मानवजातीसाठीं त्यांनीं आपलें शरीर अक्षरशः झिजविलें आहे. आतां अंगांत प्राण कोठून राहणार? त्यांच्या या उपवासाला capacity fast असें नांव कांहीं लोकांनीं दिलेलें वर्तमानपत्रांत वाचलें. अर्थात् आतां झेपत नाहीं असें वाटल्यास गांधी उपवास सोडून देतील असें या लोकांना सुचवावयाचें आहे. पण गांधी म्हणाले होते, 'मी एकवीस दिवस उपवास करणार आहें.' याचा अर्थ त्यांना प्राणान्तिक उपवास करावयाचा नाहीं. पण २१ दिवसांच्या आंत ते उपवास सोडतील असें वाटत नाहीं. त्यांना उपवासांतून सुखरूपपणें बाहेर पडावयाचें आहे. त्यांनीं स्वतः आपल्या डॉक्टरांना जवळ बोलावून घेतलें आहे. सरकारनेंहि त्यांना या सवलती दिल्या आहेत. तथापि आम्हांला फार काळजी वाटत आहे. वास्तविक हवेच्या दृष्टीनें हे दिवस किती आल्हाददायक असतात! सायंकाळ इतकी रम्य आणि सुखकारक असते कीं, आम्हीं बाहेर असतांना अशी रम्य सायंवेळा कधीं पाहिली होती किंवा नाहीं असें वाटावें! रात्रीचें चांदणें आणि सुखकर थंड हवा यांना शब्दांत कागदावर उतरविणेंच कठीण! तथापि निसर्गाच्या अमूल्य देणगीकडे कोणाचें फारसें लक्षच नाहीं. चांदण्यांत आपण सर्वजण जेवायला बसूं असें मी सुचविलें, पण कोणालाच उत्साह नव्हता. नाहीं तर एरवीं किती हंसत खेळत आणि रमत गमत हा चांदण्यांतला भोजनसमारंभ पार पडला असता. निर्जीवपणें सर्वांचे व्यवहार चालले आहेत!

* * *

मन उद्विग्न होण्यासारखी गांधींच्या प्रकृतीची बातमी तर आजच्या वर्तमानपत्रांतून आहेच. पण त्याहिपेक्षा अधिक संताप उत्पन्न करणाऱ्या अनेक गोष्टी आजच्या वर्तमानपत्रांतून पसरल्या आजच्या तारखेच्या वर्तमानपत्राचा अंक पुढें कोणी काढून पाहिला तर त्यावेळीहि त्याला चीड आल्याशिवाय राहणार नाहीं ! आमच्याच देशांत आम्ही बंडखोर झालों ? आमचा सर्वश्रेष्ठ पुढारी ' बंडखोर ' आहे ? कुणाचा देश आणि कोण बंडखोर ? पिंजऱ्यांत सापडलेल्या सिंहाला पटेल त्यानें खडा मारावा त्याप्रमाणें सारा प्रकार आहे ! परकीयांनीं आमची अवहेलना केली तर आम्हांला अपमानित झाल्यासारखें वाटतेंच पण आमचेच काहीं शहाणे जेव्हां आम्हांला मोठ्या ऐटीनें शहाणपणा शिकवायला जातात तेव्हां खरोखरच त्यांचा फार राग येतो. मनाचा साधा मोठेपणाहि यांच्या ठिकाणीं नाहीं ! ज्यानें उठावें त्यानें महात्मा गांधींवर हल्ला करावा असें आजचें बातमीपत्र दाखविते. हिंदुस्थानांतील कोनकोपऱ्यांतून गांधींना ' ताबडतोब बिनशर्त सोडा, ' असा सारांचा व्हाईसरॉयकडे वर्षाव होत असतांना आमच्या काहीं स्वयंमन्य पुढाऱ्यांना (!) गांधींना बाहेर सोडल्यानें देशांत प्रलयकाल होईल अशी भीति वाटते. मनुष्यस्वभावाचा थांग लागणें कठीण आहे हें खरें आहे ! ऍरिस्टॉटलनें ' आदर्श गुलामा 'ची व्याख्या केली आहे. ' ज्याला अक्कल कळते पण ज्याच्याजवळ ती नाहीं तो आदर्श गुलाम होय. ' ( men able to understand reason without possessing it ) तशी आमच्यातील काहीं लोकांची अवस्था झाली आहे. विचार करता त्यांच्याकडे दुर्लक्ष करावें हेच बरें असें वाटतें. ते गांधींच्या अगर काँग्रेसच्या विरुद्ध बोलतात, म्हणून त्यांना राग येत नाहीं, तर त्यांचा लाळघोटेपणा पाहून किळस उत्पन्न होते. कुणीं सरळ, प्रामाणिक टीका आमच्यावर अगर आमच्या पुढाऱ्यांवर केली तर त्यांत रागवायचें काय कारण ? राजकारणांत तर हा नेहमीचाच प्रसंग आहे.

पण याहिपेक्षा चित्त अस्वस्थ करणारी गोष्ट म्हणजे हिंदीतरांनीं हिंदवासीयांना उद्देशून केलेलीं अपमानकारक भाषणें ! आम्ही तीं सहन कां करतों ? आम्ही तीं सहन करतों, कारण आम्हांला तसें करण्याखेरीज गत्यंतर

नाहीं म्हणून ! आम्ही कुणाचा द्वेष करीत नाही आणि आम्हाला कोणावर सूड उगविण्याचीहि इच्छा नाहीं. पण इतरांप्रमाणेंच आम्हालाहि मानानें जगांत रहावयाला मिळावें आणि आमचा व आमच्या पूज्य पुढाऱ्यांना अनुचित प्रकारें अपमान कोणाकडून केला जाऊं नये अशी आमची इच्छा आहे. आमच्यावर वाटेल तसे हीन हल्ले कोणी केले तरी ते मुकाट्यानें सहन केले पाहिजेत अशी आमची सध्या स्थिति झाली आहे. आज राष्ट्रातील पौरुष कोठें गेलें ? अन्यायाचा आणि अपमानाचा प्रतिकार आम्हाला हिंसेनें करावयाचा नाहीं, पण आम्हाला स्वाभिमान आहे, आमच्यात जीवंतपणा आहे, हें शांततामय पण तेजस्वी वागणुकीनें आम्ही दाखवूं शकणार नाहीं काय ? संवयीनें आम्ही वाटेल तो अपमान गिळून टाकतो. जणूं काय तो आमचा **'जन्मसिद्ध हक्कच'** आहे ! याच्या उलट आमच्याच सारखे इतर देशातील तरुण पहा ! ते कधीं आपल्या आणि आपल्या देशाचा अपमान सहन करतील ? त्यांची स्वाभिमानी वृत्ति आणि स्वतंत्र वागणूक हीं पाहून तरी आमच्या तरुणात चेव उत्पन्न झाला पाहिजे. आजच्या हिंदी तरुणात अन्यायाबद्दल चीड निर्माण होते, नाहीं असें नाहीं. पण ती लवकर विझून तरी जाते किंवा ती प्रत्यक्ष कृतींत कशी आणावी हें कळेनासें होऊन त्यांना स्वस्थ तरी बसावें लागतें. मला असें वाटतें कीं, आमच्या देशातील तरुणांच्या सुप्त शक्तींचा घ्यावा तसा उपयोग करून घेतला जात नाहीं, तरुण पिढीवर नेत्यांचा विश्वास नाहीं. त्यामुळें तरुणांना हाताशीं धरून त्यांच्या अमाप शक्तीचा योग्यप्रकारें उपयोग करून घेण्याकडे राष्ट्रनेत्यांचें दुर्लक्ष होतें. खुद्द कॉंग्रेसनेहि राष्ट्रांतील तरुणांची आपल्या कार्याला पोषक अशी संघटना चांगल्या प्रकारें केलेली नाहीं. राष्ट्रसेवादलासारख्या संस्था कॉंग्रेसच्या प्रेरणेनेंच काम करतात पण कॉंग्रेसचे पुढारी या संस्थाविषयीं सामान्यतः उदासीनच आहेत. नुसता एखादा ठराव करून पाठिंबा दिल्यानें काम होत नाहीं. निश्चयपूर्वक सेवादलाची संघटना आणि कार्य करवून घेण्याची जबाबदारी कॉंग्रेसच्या अधिकाऱ्यांनीं स्वीकारली पाहिजे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, कॉंग्रेसमधील तरुणांवर कॉंग्रेस पुढाऱ्यांचा तिळमात्र विश्वास नाहीं. त्यांना वाटतें ' हे सोशालिस्ट आहेत. हे कम्युनिस्ट आहेत, हे प्रबल

होऊन आपलें राजकारण पुढें घुसडतील.' पण हा व्यर्थ भ्रम आहे. तरुण-पिढीला सत्ताग्रहणाचें राजकारण करावयाचें नाहीं. त्यांना तरुणांची तेजस्वी संघटना करावयाची आहे. ती त्याना मोकळ्या मनानें करूं द्यावी व त्यांना शक्य तें साहाय्य मन:पूर्वक करावें हेंच अधिकाऱ्यांना योग्य होय. इतर राष्ट्रांत तरुणांच्या केवढाल्या मोठ्या संघटना आहेत! त्यांच्या राष्ट्राच्या स्वाभिमानाचें प्रतीक म्हणून त्यांच्याकडे बोट दाखवितात. तरुण नागरिकांतील दुर्दम्य आशावाद, निर्भय वृत्ति, कार्य करण्याची उत्सुकता, अन्यायाची चीड इत्यादि सद्‌गुणांचा उपयोग करण्याची संधि राष्ट्र त्यांना देतें. आमच्याकडे तसें कां नाहीं? नाहीं म्हणावयास राष्ट्रीय स्वयंसेवक संघ आणि खाकसार या तरुणांच्या चळवळी पद्धतशीरपणें आपल्या देशांत चालू आहेत. पण त्या शुद्ध जातीय चळवळी असल्यानें त्याच्यापासून देशाचा फायदा होण्याऐवजीं नुकसानच होण्याचा संभव फार. तथापि मला वाटतें आपण त्यांच्या इतर वैशिष्ट्याकडे न पाहतां त्यांच्या संघटनकौशल्याकडे पाहिलें तर आपणास—कॉंग्रेसवाल्यांस—बरेंच शिकण्यासारखें आहे. त्यांची शिस्त, त्याचा नियमितपणा, तरुण विद्यार्थी व नागरिक यांना एकाच भावनेनें भारून टाकण्यांतील त्याची कुशलता व प्रसिद्धीची हाव न बाळगतां हळूहळू आपलें जाळें सर्वत्र पसरण्याचें त्याचें धोरण हीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. अशा प्रकारच्या कार्याला लागणारी तळमळ, चिकाटी आणि संघटनाकौशल्य त्यांच्या ठिकाणीं आहे. म्हणूनच हळूहळू पण निश्चयपूर्वक या संघटना आपलें कार्य स्थिर करीत आहेत. दुर्दैवानें जातीय वादासारख्या सर्वस्वी बुरसलेल्या व संकुचित धोरणावर त्या चालविल्या जात आहेत, ही खेदाची गोष्ट आहे. राष्ट्रसेवादलानें मात्र '**जातिधर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद**' हें ध्येय आपल्यापुढें ठेवून महाराष्ट्रांतील राष्ट्रीयवृत्तीच्या तरुणाची संघटना करण्यास सुरुवात केली आहे. ही संघटना मजबूत करून प्रांतातील सार तरुण तिच्या कक्षेत आणणें आणि तिला राष्ट्रांतील मूक महत्त्वाकांक्षेचें जिवंत प्रतीक बनविणें हेंच मुख्य कार्य कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं आपणापुढें ठेवणें जरूर आहे. तरुणांची एवढी शक्ति फुकट कां घालवावयाची? तरुण लोकांवर विश्वास टाकून त्यांच्याकडे जबाबदारीची

कामें सोंपविण्यास कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं कचरूं नये. याच तरुण सेनेचा उपयोग सर्व राष्ट्रसंवर्धक कार्यक्रम पार पाडण्याकडे होईल. पण आजच्या कार्य-कर्त्यांना अजून एक दोन बाबींखेरीज इतर कार्यक्रमाचें महत्त्व फारसें पटल्याचें दिसून येत नाहीं. गांधींनीं त्याचा समावेश आपल्या विधायक कार्यक्रमाच्या यादींत केला आहे म्हणून तेहि त्याला विधायक कार्यक्रम म्हणतात एवढें खरें, पण साक्षरता प्रसारासारख्या अत्यंत मूलगामी कार्य-क्रमाकडेहि एकंदरींत त्यांचें दुर्लक्षच आहे.

आजच्या वर्तमानपत्रातील विशिष्ट बातम्यांवरून हे व असेच आणखी कांहीं विचार माझ्या मनामध्यें येऊन गेले व मी त्याबाबत इतरांशीं थोडीबहुत चर्चाहि केली. रवींद्रनाथांच्या शब्दात म्हणावयाचें तर—

This I know
That I have to fight with the waves
And carry the boat,
Hang the shrouds,
And hold the helm—
This is the command,
This is the destiny.

( मला एवढेंच माहित आहे कीं, प्रचंड लाटांशीं टक्कर देणें व स्वतःची नाव हाकारणें हें मला केलेंच पाहिजे. ' दोर ताणून बसव व सुकाणूं हातांत ठेव ' हाच ( परमेश्वराचा ) हुकूम आणि हेंच माझें दैव होय. )

* * *

सध्यां मी " One hundred great lives " ( शंभर मोठया व्यक्ति) हें टाईम्स–स्टेट्स्मन् याच्या The Home Library Club नें प्रसिद्ध केलेलें पुस्तक वाचीत आहे. ७६० पानाच्या या पुस्तकात १०० थोर व्यक्तींचीं चरित्रें थोडक्यांत पण मार्मिक भाषेंत देण्यात आलीं आहेत. प्रत्येक चरि-त्राला साधारणतः ७।८ पानें अशी समविभागणीच करण्यांत आली आहे. चरित्रविषयक प्रत्येक व्यक्तीचें जीवन व कार्य एवढ्याशा मर्यादेंत देण्यात फार कौशल्य दाखविण्यांत आलें आहे. प्रत्येक चरित्र अत्यंत मनोरंजक

व उद्‌बोधक आहे चरित्रविषयक व्यक्तीच्या जीवनाचे रहस्य मार्मिकपणे वर्णिण्यात आले आहे. प्रत्येक चरित्राची सुरुवात तर फारच बहारीची करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक व्यक्तीच्या कार्याचे सार ८।१० ओळींत प्रथमच इटालिक टाइपमध्ये दिले आहे. भाषा साधी व सुंदर असून चरित्रांतील महत्त्वाचे प्रसंग व काल एखाद्या मनोरंजक कथेप्रमाणे एका सूत्रांत गोवण्यांत आले आहेत. एकदरीत पुस्तक मला फार आवडले. प्रत्येकानें आपल्याजवळ हें पुस्तक ठेवण्याजोगे आहे. केव्हांहि पुस्तक उघडून कोणतंहि चरित्र वाचले तरी मनाला आल्हाद झाल्याखेरीज राहणार नाहीं.

Lord Avebury यानीं काही वर्षांपूर्वी Hundred best books of the world—जगातील शंभर सर्वोत्कृष्ट पुस्तकें—निवडली होती. त्यांत **रामायण, महाभारत** व **शाकुंतल** या तीन भारतीय ग्रंथांना स्थान मिळाले होते. या शंभर चरित्रांतहि **महात्मा गांधी, अशोक, गौतम बुद्ध** या तीन महान् व्यक्तींच्या चरित्रांचा समावेश करण्यात आला आहे. निरनिराळ्या देशांतील थोर व्यक्तींची चरित्रे लिहितांना प्राचीन काळापासूनचा आढावा घेतल्यासारखेच झालें आहे. कारण प्राचीन काळापासून विद्यमान व्यक्तीपर्यंत सर्व कालातील व्यक्तींचें चरित्र चित्रणग्रथांत आले आहे. अर्थात्‌च चरित्रविषय निवडताना बराच विचार करावा लागला असेल यात शंका नाहीं.

या पुस्तकातील चरित्रें सात विभागात विभागण्यात आलीं आहेत. ते विभाग असे (१) शास्त्रज्ञ व शोधक २३ चरित्रे (२) लेखक व कवि १६, (३) नेते व सुधारक १२, (४) कलावन्त व संगीतज्ञ ७, (५) थोर स्त्रिया ७, (६) संशोधक ( Discoverers and Explorers ), ६. (७) सेनापति व मुत्सद्दी किंवा राजकारणी पुरुष २०. अशोकाचे नांव शेवटच्या विभागात, महात्मा गांधी व गौतमबुद्ध यांचा समावेश नेते व सुधारक या वर्गात करण्यांत आला आहे

पुस्तक उत्कृष्ट प्रकारें लिहिलें गेलें आहे हें खरें. पण त्यात काही उणीवाहि आहेत असे वाटते. त्या उणीवा म्हणजे ज्या काहीं विशेष व्यक्तींची चरित्रें या ग्रंथात यावयास जरूर होतीं त्यांचीं नावे येथे दिसत नाहीत, या

होत. अर्थात् जगातील सर्व देशांतील हजारों वर्षांच्या इतिहासांतून केवळ शंभर व्यक्तींची निवड करावयाची आणि तीहि वर लिहिलेल्या, समाजातील निरनिराळ्या जीवनवैशिष्ट्यांतून ! त्यामुळें साहजिकच नाइलाजानें अनेक व्यक्तींचा चरित्रें वगळून जाणें शक्य आहे. म्हणूनच प्रकाशकाला दोष द्यावा असें मला वाटत नाहीं. उलट अशा तऱ्हेचा उत्कृष्ट चरित्रसंग्रह संपादित केल्याबद्दल त्याचें अभिनंदन करावेसें वाटतें व मराठींत त्याचें अनुकरण व्हावें, अशी इच्छा व्यक्त करावीशी वाटते. असें जरी आहे तरी कांहीं व्यक्तींचीं नांवें पुस्तकांत यावयास पाहिजेच होतीं, त्यांचा समावेश कसा केला गेला नाहीं याचें जरा आश्चर्य वाटतें. उदाहरणार्थ, 'लेखक व कवि' या वर्गांत त्रिखंडकीर्ति इंग्रज कवि शेक्सपीयर याचा समावेश केलेला नाहीं, त्याचप्रमाणें जर्मन कवि गटे यालाहि स्थान मिळालेलें नाहीं. ज्याच्या वाङ्मयानें कोट्यवधि रशियनांना आणि जगांतील त्याच्या चाहत्यांना अखंड स्फूर्तीचा झरा प्राप्त करून दिला त्या मॅक्झिम गॉर्कीचें चरित्र या ग्रंथांत यावयास नको होतें काय ? आणि टॉलस्टॉयसारखा महान् लेखक वगळला जावा हेंहि आश्चर्यजनकच वाटते. रशियाचाच विचार करावयाचा झाला तर चेकॉव्हसारखा लघुकथासम्राट आणि डोस्टोव्हस्की, पुष्किन यांसारखे विख्यात लेखक यांची निवड कशी झाली नाहीं हें एक कोडेंच आहे. किंबहुना एकाहि रशियन लेखकाला स्थान देण्यांत आलेलें नाहीं. भारतीय व्यक्ति म्हणून नव्हे तर जगातील एक सर्वश्रेष्ठ कवि म्हणून कालिदासाचा समावेश अवश्य व्हावयास पाहिजे होता आणि एकापेक्षां एक सरस काव्यें रचून आधुनिक विश्वाला डोलावयास लावणाऱ्या रवींद्रनाथांना एका जागेवर खात्रीनें हक्क होता. पर्ल बक या आधुनिक श्रेष्ठ कादंबरी लेखिकेलाहि स्थान देण्यांत आलेलें नाहीं. कोणत्याच विद्यमान लेखकाला स्थान देण्यांत आलेलें नाहीं हें त्याचें कदाचित् कारण असावें. शास्त्रज्ञांचीं नांवें घेतांना वनस्पतींनाहि जीव असतो, आणि त्या हंसतात रडतात, त्यांना भावना आहेत असें प्रथमच सप्रयोग दाखविणाऱ्या जगदीशचंद्र बोसांचें नांव निःपक्षपाती दृष्टीसमोर उभें राहिल्याशिवाय कसें राहील ? आणि प्रकाश किरणांच्या बाबतींत अभिनव संशोधन करून हिंदुस्थानचें नांव शास्त्रीय

जगांत उज्वल करणारे **चंद्रशेखर रमण**, ज्याच्या नांवानें Raman Effect असा गौरवार्थी शब्दप्रयोग त्याच्या शोधाबाबत वापरला जातो, त्याचेंहि स्मरण झाल्यावाचून राहत नाहीं. लेखक वर्गांत **शेक्सपीयरादिकांचीं** चरित्रें देण्यात आलीं नाहींत. त्यांत कदाचित् असा हेतु असावा कीं, त्यांचीं चरित्रें सामान्यत. सर्वांस माहीत असल्यानें तीं पुन्हा देण्यात कांहीं स्वारस्य नाहीं. पण असें म्हणावें तर **व्हाल्टेअर, रूसो, बेकन, डॉ. जॉन्सन** अशा, सर्वांना साधारणपणें परिचित असलेल्या लेखकांचीं चरित्रें देण्यात आलीं आहेत. त्यावरून साधारणत. आपल्या पसंतीप्रमाणें अगर सारासार बुद्धीनें योग्य वाटली ती निवड प्रकाशकांनीं केली असेंच वाटतें आणि तेंहि एका दृष्टीनें योग्यच आहे. सर्वांचाच समावेश कसा करणार ?

नेते व सुधारक या मथळ्याखालीं ज्याचा समावेश करण्यांत आला आहे ते सर्वच थोर पुरुष आहेत यांत शंका नाहीं. पण तेथेंहि कांहीं नांवें नसलेलीं पाहून सखेदाश्चर्य वाटतें. उदाहरणार्थ, आधुनिक **चीनचा जनक डॉ. सन्यत्सेन** याचें नाव कोणत्याहि यादींतून गाळण्यासारखें खास नाहीं. त्याचप्रमाणें **लेनिन् ,एंजल्स** आणि **रोमां रोलां** हींहि नांवें कांहीं विसरण्या-सारखीं नाहींत. **बुकर टी वॉशिंग्टन्** याचें चरित्र तर खास गाळतां येण्या-सारखें नाहीं. **सर थॉमस मूर** सारख्याच्या ऐवजीं वरीलपैकीं एखाद्यास अवश्य स्थान देतां आलें असतें. **जोन ऑफ आर्कचें** उज्ज्वल चरित्र जेथें आहे तेथें **झांशीच्या लक्ष्मीबाईचें** तेज काय कमी पडलें असतें ? आणि राणी **एलिझाबेथबरोबर नूरजहान** आणि **अहल्याबाई** या कर्तबगार राजकारणी स्त्रिया खात्रीनें शोभूनच दिसल्या असत्या. ‘ थोर स्त्रिया ’ या सदराखालीं या स्त्रिया अवश्य येऊं शकतात. आणि आपल्या अपूर्व कर्तबगारीनें जगाला वाहवा म्हणावयास लावणाऱ्या **मादाम चिआंग कै शेक** या स्त्रीरत्नाचा समावेश केल्याशिवाय स्त्रियांची कोणती यादी पूर्ण होऊं शकेल ? मात्र प्रकाशकांनीं निवडलेल्या सर्व स्त्रियाहि अत्यंत थोर अशाच होत्या यांत शंका नाहीं. **एलिझाबेथ फ्राय** आणि **फ्लॉरेन्स नाइटिंगेल** या देवतातुल्य स्त्रियांचें चरित्रवाचन तर अत्यंत आल्हादकारक आणि उद्-बोधक आहे. तें सर्वांनीं अवश्य वाचावें.

कलावन्ताच्या यादींत घालण्यासारखीं इतर नावे मात्र मला बिलकूल माहीत नाहींत आणि त्यामुळेंच त्याबाबत मला कांहीं म्हणता येण्याजोगें नाहीं. त्याचप्रमाणें जगप्रवासी शोधकांच्या बाबतींतहि विशेष कांहीं म्हणण्यासारखें नाहीं. सहाहि जणांचीं चरित्रे फार मनोरंजक व नवलपूर्ण आहेत. मला हा विषय विशेष आवडीचा वाटत असल्याने अर्थातच मी तीं सर्व चरित्रें विशेष लक्षपूर्वक वाचली आहेत. कै. **अमुडसेन, इब्न बत्तूत, फाह्यन, ह्युएनत्संग**, इत्यादिकांचीं चरित्रेंहि येथ देता आलीं असतीं तर अर्थात् चांगलें झालें असतें.

सेनापति आणि मुत्सद्दी ( Soldiers & Statesmen ) या सदरांत मात्र सर्वांत जास्त म्हणजे ३० चरित्रे देण्यात आलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं कमी करून संशोधकाच्या अगर स्त्रियांच्या यादींत जास्त भर घालता आली असती. पण इतिहासांत सामान्यतः राजे आणि राजकारणधुरंधर व्यक्ती यानाच महत्त्व देण्यात येत असल्यामुळें आणि सेनापति हे तर स्वत: जगाचा इतिहास घडवीत असल्यामुळें त्याना सर्वांत जास्त जागा देण्यात यावी हें क्रमप्राप्त होतें. तथापि तेथेंहि माझ्या मतें कांहीं नावे कमी करून त्याऐवजी **सम्राट् चंद्रगुप्त** अगर **हर्षवर्धन, अकबर, शिवाजी** या भारतीय वीरांची निवड सहज करता आली असती, नव्हे, तसें जरूरच होतें. **ॲटिला** या हूण जगज्जेत्याचें नाव आहे तर **चेंगीजखान**ला का वगळलें ? **शिकंदर, ज्यूलियस सीझर** यांच्यापेक्षाहि त्याने आक्रमिलेला प्रांत खूपच मोठा होता. शूर व धोरणी सेनापति आणि चतुर मुत्सद्दी म्हणून नाणावलेल्या **चिआंग कै शेक**ला स्थान न देण्यात एकपरी अन्याय झाला आहे असेंच म्हणावयास हरकत नाहीं. शेवटचीं कांहीं चरित्रे मात्र खरोखरच फार उद्बोधक आहेत.

अशा रीतीनें कांहीं थोर व्यक्तींचा या पुस्तकांत अवश्य समावेश असावयास पाहिजे होता हें जरी खरें असले तरी मला वाटतें, त्यासाठीं एखादें दुसरें पुस्तक लिहावयास पाहिजे आणि टाईम्स होम लायब्ररीनें अशाच सुंदर रीतीनें लिहिलेल्या चरित्रांचे आणखी कांहीं खंड प्रसिद्ध केले तर रसिकांची बिलकूल वाण पडणार नाहीं असें मला वाटतें. किंबहुना त्यांनीं वाचकांवर

मोठा उपकार केल्यासारखेंच होईल. बक्षिसादाखल कोणाला पुस्तक द्यावयाचें झालें तर मी या पुस्तकाची निवड करीन.

मला आवडणारीं यांतील कांहीं चरित्रांचीं नांवें टिपून ठेवावीं असें वाटलें होतें पण तें अशक्य आहे असें मला वाटतें. कारण मनांत विचार करूं लागलों तेव्हां हळूहळू सर्वच यादी—कांहीं चरित्रें सोडून—उतरावी लागेल असें दिसून आलें. निदान ५०।६० चरित्रें तरी सहज निवडण्यासारखीं आहेत आणि त्यांतील १० अगर १५ च उत्कृष्ट चरित्रें निवड असें कोणी मला सांगितलें तर तें मला खात्रीनें जड गेल्याशिवाय राहणार नाहीं.

एक मात्र वाटतें कीं, पुन्हा असा एखादा खंड प्रसिद्ध करण्याचा प्रसंग आला तर प्रकाशकांनीं 'प्रसिद्ध खेळाडू' असें एक नवीन सदर घालून त्यांत जगप्रसिद्ध खेळाडूंचीं चरित्रें द्यावीं तीं लोकांना खात्रीनें आवडतील.

गांधींच्या प्रकृतीविषयीं चांगलेंसें कांहींच कळत नाहीं पण ती ठीक नाहीं एवढें मात्र खरें! सर्वजण काळजींत आहेत. वाचन-लेखनाकडेहि कोणाचें चांगलेंसें लक्ष लागत नाहीं.

●

## १८-२-४३

आज गांधींच्या प्रकृतीविषयीं His health continues to cause anxiety (त्यांची प्रकृति अजून काळजी करण्यासारखीच आहे) असें वर्तमानपत्रांत आलें आहे. त्यामुळें दररोजच्या काळजींत आणखी भर पडली आहे. एकंदरींत परिस्थिति कठीण आहे हेंच खरें! आम्हां सर्वांना तर अत्यंत काळजी वाटतेच पण महात्माजींच्या निकट सान्निध्यांत राहिलेले **श्री. नरहरीभाई परीख, लक्ष्मीदासभाई** इत्यादिकांना काय वाटत असेल याची कल्पनाच केलेली बरी वाटेल त्या प्रकारचे विचार मनांत येत आहेत. लोक खेळतात, बोलतात, वाचतात, सर्व कांहीं नेहमींप्रमाणें चाललें आहे. पण सर्व व्यवहारावर काळजीची छाया पसरली आहे. कांहीं

जण गांधींची कुंडली मांडून बसले आहेत. माझा तर त्यावर बिलकूल विश्वास नाहीं. गांधींचा प्राण म्हणजे राष्ट्राचा प्राण—तोच पणाला लागल्यावर कोणाला काय सुचणार? इतर विषयात मन गुंतवून मनावरील भार हलका करावा हेच बरें!

*    *    *

आजहि माझ्या मनांत "One hundred great lives" या पुस्तकाबद्दल विचार चालू आहेत. वाटतें अशी पुस्तकें मराठींत प्रसिद्ध झाली पाहिजेत ज्ञान–प्रसाराचें मुख्य साधन म्हणजे पुस्तकें! नवीं नवीं पुस्तकें प्रसिद्ध होत जाणे हें जिवंत वाङ्मयाचें लक्षण आहे. मराठींत अशीं पुस्तकें आणि तींहि नवीन विषयावर आणि अभिनव पद्धतीनें लिहिलेली प्रसिद्ध होणें आवश्यक आहे माझ्याजवळ येथे संदर्भ ग्रंथ नाहींत अगर पुस्तकालयाहि नाहींत. पण मला वाटतें कीं, श्री. **माटे** यांनीं अशा पद्धतीवर काहीं चरित्रें लिहिलीं आहेत. त्याचप्रमाणें प्रा. **वनहट्टी** यांचें '**एकावळी**' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें असून त्यात काहीं व्यक्ति–चरित्रात्मक लेखांचें संकलन करण्यात आलेले आहे. शिवाय निरनिराळ्या नियतकालिकांतून काहीं चरित्रें मधून मधून प्रसिद्ध होतातच. तथापि वरील पुस्तकात ज्या प्रकारचीं लघुचरित्रें लिहिण्यात आलीं आहेत, तशा प्रकारचीं लघुचरित्रें मराठींत फारशी नसावीत असें मला वाटतें. नवभारत ग्रंथमालेच्या '**साहित्य साधना**' या ग्रंथात मला वाटतें बहुधा मोठ्या चरित्राचा–चरित्रग्रंथाचा —विचार करण्यात आला आहे. मला चांगलेसें आठवत नाहीं. 'One hundred great lives' यासारखं पुस्तक मराठींत प्रसिद्ध करण्यात एक अडचण अशी आहे कीं, इंग्रजी भाषा जगभर बोलली जात असल्यामुळ आणि अर्थात् त्या भाषेंत लिहिलेल्या चांगल्या पुस्तकांच्या हजारों–लाखों प्रती खपत असल्यामुळें मोठीं पुस्तकेंहि त्या मानानें स्वल्प किंमतींत विकलीं जाऊं शकतात. पण मराठीचा वाचकवर्ग त्या मानानें कितीतरी लहान असल्यानें व त्यातहि स्वतःचीं पुस्तकें विकत घेऊन तीं वाचणारा वर्ग त्याहूनहि कमी असल्यानें पुस्तकाच्या फारशा प्रती खपण्याचा संभव नसतो आणि असें झालें म्हणजे पुस्तकाची किंमतहि त्यामानानें जास्त

ठेवावी लागते. विविध प्रकारचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्यात ही मुख्य अडचण आहेच. पण त्याशिवाय दुसरी एक अडचण अशी आहे कीं, केवळ लेखनावर आपली उपजीविका चालवूं शकणे मराठी लेखकाना जवळ जवळ अशक्य आहे. त्यामुळे लेखकाना उत्कृष्ट लेखन हें आपलें जीवितध्येय करून आपल्या कलेची जोपासना अव्याहतपणे करीत राहणें कठीण भासूं लागतें. त्यामुळें आपल्याकडे केवळ लेखनाचा धंदा करून उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिति करणारे साहित्यिक कमीच. जे लेखक म्हणून चागले नावाजलेले आहेत ते, त्या पुस्तकावर चागला पैसा मिळेल अशींच पुस्तकें लिहिण्याकडे सहसा आपल्या लेखणीचा ओघ वळवितात. तथापि हें विधान सरसहा सर्वांना लागूं पडण्यासारखें नाहीं. केवळ उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिति करणें आणि लेखनाच्याद्वारा समाजाची सेवा करणें या उच्च ध्येयान प्रेरित होऊन ग्रंथनिर्मिति करणारे लेखक महाराष्ट्रात आहेत. हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रातीय भाषातील वाङ्मयात मराठीचा दर्जा बराच वर लागतो. म्हणून वरील चरित्रात्मक पुस्तकात चरित्रें ज्या कुशलतेनें लिहिलीं गेलीं आहेत तशा प्रकारची कुशलता वापरणारे लेखक मराठींत नाहींत असें मला म्हणवत नाहीं. पण प्रकाशक भेटला पाहिजे ना ? टाईम्ससारखा प्रकाशक मराठींत निघेल तेव्हा सुदिन ! पण **केसरी, चित्रमयजगत्, किर्लोस्कर** यासारख्या नियतकालिकानीं आपल्या वर्गणीदाराच्या आणि वाचकाच्या जिज्ञासा तृप्त करणारें व वाढविणारें वाङ्मय टाइम्सच्या योजनेसारखें निर्माण करावयास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, छोटीं छोटीं चरित्रें असलेलीं पुस्तकें त्यानीं मुद्दाम लिहून घेऊन तीं माफक किंमतींत विकावयास हरकत नाहीं. शंभर नाहीं पण २५–५० चरित्राचा संग्रह तरी एकावेळीं त्याना प्रसिद्ध करता येईल. जी गोष्ट चरित्रग्रंथाची तीच इतर पुस्तकाबाबत.

*　　　*　　　*

मला असें आठवतें कीं, मी लहान होतों त्यावेळीं खानापूरचे '**लोकमित्र**' मासिक आमच्याकडे येत असे. त्याचे संपादक **श्री. द. गो. खडेकर** हे फारच उद्योगी गृहस्थ असत. आम्ही खानापूरला होतों तेव्हा त्याच्या '**धनंजय**' छापखान्यात केव्हा केव्हा जात असूं. ते आपल्या '**लोक-**

मित्र ' मासिकाच्या वर्गणीदाराना प्रतिवर्षी एखादें पुस्तक बक्षीस म्हणून देत असत. त्यांपैकीं ' पंजाबच्या लढवय्या शीख ' हें पुस्तक मला फार आवडलें होतें. अजूनहि तें चांगलें आठवतें. पण त्याची प्रत मात्र आमच्या घरात कोठेंहि नाहीं. कोणीतरी वाचायला नेऊन परत दिली नसेल ! त्या पुस्तकात शीख लोकांच्या गोष्टी मोठ्या मनोरंजक भाषेंत लिहिल्या होत्या. फार छान होतें तें पुस्तक ! अजूनहि मला तें कोठें आढळल्यास मी तें उत्सुकतेनें वाचीन. तेव्हा ' लोकमित्र ' मासिकानें अशीं पुस्तकें आपल्या वर्गणीदाराना देण्याची पद्धत ठेवली होती. मात्र अशीं पुस्तकें छापताना प्रकाशकानीं आपल्या फायद्याकडे पाहूं नये. नाही तर किंमती वाढून कोणी पुस्तकें विकत घेणार नाहींत. एकतर असे चरित्रविषयक लहान लहान लेख अगर दुसरें लिखाण नियतकालिकातून नियमित क्रमशः प्रसिद्ध करावे व त्याच कंपोजचा उपयोग करून पुस्तकें छापावीं किंवा इंग्रजींतील penguin, pelican series प्रमाणें अगर हिंदींतील सस्ता साहित्य मंडळ, मायासिरीज, सरस्वतीसिरीज यासारखीं स्वस्त पुस्तकें काढण्याची योजना करावी. मराठींत काहीं ' माला ' आहेत. त्या चांगल्याहि आहेत. पण सर्वांना त्या मालातील पुस्तकें परवडत नाहींत. ' वादविवेचन माला ' त्या मानानें चांगली आहे. त्यानीं निरनिराळ्या विषयावरील पुस्तकें संपादून प्रसिद्ध करावीं.

मराठींत पुस्तकाचा प्रसार व्हावयास वाचकाची संख्या वाढली पाहिजे हें उघड आहे. वाचकाची संख्या वाढावयाची म्हणजे साक्षरतेचें प्रमाण फार वर गेलें पाहिजे. साक्षरतेचें प्रमाण सध्या शें. ११ पुरुषात आणि शें. ६ स्त्रियात धरलें जातें. मुंबईला शहरी वस्ती असल्यामुळें हें प्रमाण जरा जास्त आहे. पण या साक्षर जनतेंत र् ट् फ् करणाऱ्या आणि साधारण सही करणाऱ्या अगर दोनचार वेड्या वाकड्या ओळी लिहिणाऱ्या व्यक्तींचीहि गणना होते. म्हणजे खरी साक्षरता किती थोड्या प्रमाणात आहे हें दिसून येतें. आपण मध्यमवर्गीतील लोक मध्यमवर्गीयातच विशेष वावरतो म्हणून आपणाला जनतेंत निरक्षरता किती पसरली आहे याची कल्पना येत नाहीं. आणि जे साक्षर लोक आहेत, त्यांपैकीं किती जणांना वाचनाची आवड

आहे ? आणि आवड असणारांपैकीं किती जणांना स्वतःचीं पुस्तकें घेऊन वाचण्याची शक्यता आहे ? या सर्व गोष्टींचा विचार केल्यावर आपल्या सर्व दुःखाचें मूळ आपली मोठ्या प्रमाणावर असलेली निरक्षरता हें आहे असें पटूं लागतें.

## १९-२-४३

रात्रीं चांदण्यांत फिरून नुकताच आलों आहे. बहुतेक सर्व लोक झोंपी गेले आहेत. बारा वाजले असतील. शुभ्र चांदण्यात एकटेच फिरणारे माझ्या-सारखे श्री. माधवराव जानोरकर एक आहेत. आज प्रथम कांहीं वेळ श्री. उमाशंकर दीक्षित यांच्याबरोबर फिरत होतों. अर्थात् प्रथम उपवासा-बाबतच बोलणें झालें, पण मग आकाशावर आमची दृष्टि खिळली आणि नक्षत्रताऱ्यांची चर्चा सुरू झाली.

कांहीं दिवसापूर्वी—साधारण १ महिन्यापूर्वी— दीक्षित व मी दोघेहि जेल हॉस्पिटलमध्यें होतों. श्री. टिळक आजारी होते. म्हणून त्यांच्याबरोबर मदतीला मीं व श्री. मेनन आजारी होते त्यांच्याबरोबर दीक्षित होते. दीक्षित हे मुंबईच्या मारवाडी चेंबर ऑफ कॉमर्सचे सेक्रेटरी आहेत. मोठे विचारी आणि बहुश्रुत दिसतात हे गृहस्थ. त्यांच्याबरोबर रात्रीं हॉस्पिटलच्या आवारात हिंडत होतों. पौर्णिमेचें सुंदर स्वच्छ चांदणें पडलें होतें, सर्वत्र शांतता होती; तपोवनात एका रांगेंत स्तब्ध बसलेल्या मुनीप्रमाणें निंबवृक्ष तटस्थ उभे होते. त्यांच्या सावल्या आणि त्यामधून डोकावणारें शुभ्र चांदणें यामधून नील आकाशाखालीं फिरणें मोठें आल्हाददायक होतें. दीक्षित यांनीं खगोलशास्त्राचा बराच अभ्यास केला आहे. मलाहि त्याच विषयाची आवड. तेव्हां साहजिकच संभाषण त्याच विषयावर वळलें. संभाषणाला सुरुवात आकाशात थोड्याच वेळापूर्वी उगवलेल्या आणि आपल्या शीतल मंद प्रकाशांत सृष्टीवर अमृताचा वर्षाव करणाऱ्या चंद्रापासून आणि त्याच्या प्रकाशांत मंदपणें चमकणाऱ्या नक्षत्रताऱ्यांपासून झाली. दीक्षित म्हणाले, ' —आपल्या

जुन्या वाङ्मयात आकाशातील ताऱ्यापैकीं फक्त नक्षत्रें आणि कांहीं विशिष्ट मोठे तारे यानाच विशेष महत्त्व दिले आहे. त्याचेंच विशेष वर्णन आढळून येतें. पण पाश्चात्यानीं सगळ्या आकाशाची विभागणी करून प्रत्येक ताऱ्याची मोजदाद व व्यवस्था लावली आहे. साधारणतः तिसऱ्या चौथ्या प्रकारच्या ताऱ्यापर्यंत सर्वांना विशिष्ट नावें असून प्रत्येक तारा कोणत्या तरी एका विशिष्ट तारापुंजात बसविलेला असतो.' ते पुढे म्हणाले, 'आपल्या जुन्या ग्रंथात कदाचित् प्रसंगानुरोधानें निरनिराळ्या ताऱ्याचे उल्लेख व वर्णन हीं आलीं असतील, पण त्याची संगतवार माहिती एकत्र अशी कोठें आढळून येत नाहीं. मी म्हटलें, 'सर्वसाधारण लोकाचे लक्ष या विषयाकडे आकर्षित होत नाहीं याचें मला आश्चर्य वाटतें. फार थोड्या लोकाना आकाशात प्रत्यहीं उगवणाऱ्या आणि मावळणाऱ्या तेजोगोलाबद्दल शास्त्रीय माहिती करून घेण्याची इच्छा असते. पूर्वी मॅट्रिकच्या अभ्यासक्रमात हा एक स्वतंत्र विषय होता म्हणतात. हल्लीं भूगोल या विषयातच त्याचा अंतर्भाव केला असावा. तथापि खगोलशास्त्र हा स्वतंत्र विषयच दुय्यम आणि उच्च विषयात नेमला जावा. सर्व शिक्षणसंस्थानून चागल्या दूरदर्शकाची व्यवस्था करावी, वगैरे वगैरे.'

आजहि त्याच विषयावर संभाषण झालें. एरवीं नित्य व्यवसायात गुंतलेल्या आणि शहराच्या गजबजाटात राहणाऱ्या मनुष्याचें लक्ष दररोज उत्पन्न होणाऱ्या व्यावहारिक प्रश्नाना सोडून या दूर दूर फिरणाऱ्या ताऱ्याऱ्याकडे वळतेंच कशाला! वॉटरफील्ड नावाच्या एका डॉक्टरनें नुकतेंच The Revolving Universe (गतिमान विश्व) नांवाचे एक पुस्तक लिहिलें आहे. दुरदर्शकाचा उपयोग न करताहि आकाशस्थ ज्योतीबद्दल सर्वसाधारण मनुष्याला काहीं ज्ञान मिळावें अशी या पुस्तकाची रचना आणि हेतुहि पण आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंतच लेखकानें म्हटलें आहे कीं, शहराच्या विद्युद्दीपाच्या लखलखाटात आणि अखंड चाललेल्या उद्योगधंद्यांत ज्यानीं पूर्वी कधींहि आकाशाकडे पाहिलेंहि नव्हतें ते लोक आता Blackout मुळें व युद्धकार्यातील निरनिराळ्या नवीन कामामुळें आकाश म्हणून कांहीं-एक वस्तु आहे आणि त्यांत ताऱ्याचा आश्चर्यकारक खच भरलेला आहे या गोष्टीकडे नव्यानेंच आकर्षित होत आहेत. विजेच्या झगझगाटांत

आकाशाकडे लक्षहि जात नसे. आता अंधारांत सहजच वर दृष्टि जाऊन तारक-दीपाचा मंद प्रकाश सुखकर वाटतो.

मग आम्ही या विषयाची शक्य तेवढी माहिती मिळविण्याचें ठरविलें. पुस्तकें आणून वाचावयाचीं आणि निरीक्षण करावयाचें. नक्षत्रें व तारे त्याचे आकार, तेज, गति, परस्पराकर्षण, उत्पत्ति, तेजोमेघ इत्यादिकाची माहिती करून घेणें फार मनोरंजक होईल. मला हा विषय खूप आवडतो. मोठे मोठे तारे वसुंधरेला—माझ्या मुलीला—दाखवीत असे. तिलाहि गंमत वाटत असे. आता येथें बराच अभ्यास होईल. बाहेर गेल्यावर तिला समजेल अशी नवीन माहिती तिला देईन.

* * *

एकटाच फिरत असताना कित्येक वेळा मजेदार विचार मनात येतात. एखाद्या नवीन भाषेचें ज्ञान करून घ्यावें असें वाटतें. पण भाषा ठरविणें मात्र कठीण वाटतें. मागें बंगाली थोडेंसें शिकलों होतों. त्या जुन्या ज्ञानाला उजळणी देऊन बंगाली चागलें वाचता येण्याइतकी तरी प्रगति करावी आणि अशा रीतीनें एका काव्यमय, सुसंस्कृत वाङ्मयाचा परिचय करून घ्यावा असें वाटतें. तोंच असेंहि मनात येतें कीं, आपणास कानडी बरेंचसें चांगलें बोलता येतें तर आपण कानडी लिपी शिकलों कीं त्या भाषेचें सुलभतेनें ज्ञान करून घेता येईल. पुन्हा मनात विचार येतात, आपला गुजराती लोकांशीं पुष्कळ संबंध येतो. त्याची भाषा व लिपीहि मराठीशीं पुष्कळशी जुळती आहे. येथें गुजराथी लोकहि बरेच आहेत. ते आनंदानें शिकवतील, तेव्हां गुजराथी का शिकूं नये ? हिंदी तर राष्ट्रभाषा ! तिचा अभ्यास केलाच पाहिजे आणि तो तसा थोडा थोडा चालूच आहे. पण त्याच्या जोडीला उर्दू शिकावें असेंहि वाटतें. म्हणजे मुसलमान समाजातील व्यक्ती आणि विचार याच्याशीं आपणाला अधिक चागल्या रीतीनें समरस होतां येईल. सध्या एका पुस्तक-लेखनांत व इतर काहीं विशिष्ट वाचनांत वेळ जात असल्या कारणानें घाई कसलीच करीत नाहीं. पण इकडे तिकडे अगर व्यायामाच्या वेळीं फिरत असतांना असल्या विचारात वेळ केव्हां निघून जातो हें लक्षातहि येत नाहीं !

२०–२–४३

आतां सध्यां दुसरीकडे लक्ष द्यायला मन कुणाचें ठिकाणावर आहे ? गांधींच्या प्रकृतीच्या काळजीमुळें सर्वांचें नेहमीचें काम अव्यवस्थित-पणें चाललें आहे. आज ' मुंबई क्रॉनिकल ' मध्यें कविवर्य रवींद्रनाथांनीं गांधींच्या विषयीं काढलेले उद्गार दिले आहेत. ते अत्यंत सुंदर आहेत. ते उद्गार असे :—

The secret of Gandhi's success, lies in his dynamic spiritual strength and incessant self-sacrifice. Many public men make sacrifices for selfish reasons. It is a sort of investment that yields handsome dividends. Gandhi is altogether different. He is unique in his nobility. His very life is another name for sacrifice.

He covets no power, no wealth, no name and no fame. Offer him the throne of all India, he will refuse to sit on it, but will sell the jewels and distribute the money among the needy. His soul is perpetually anxious to give and he expects absolutely nothing in return, not even thanks. This is no exaggeration, for I know him well.

Emperors and Maharajas, guns, and bayonets, imprisonments and tortures, insults and injuries, even death itself, can never daunt the spirit of Gandhi.

He is a liberated soul. If anyone strangled me I shall be crying for help; but if Gandhi were strangled, I am sure, he would not cry. He may laugh at his strangler and if he has to die, he will die smiling.

I am nothing compared to his illumined soul ... ... when the time comes Gandhi will be known, for the world needs him and his message of love, liberty and brotherhood.

The soul of the East has found a worthy symbol in Gandhi; for he is most eloquently proving that man is

essentially a spiritual being, that, he flourishes the best in the realm of the moral and the spiritual and most positively perishes both body and soul in the atmosphere of hatred and gunpowder smoke

(गांधीजींच्या यशाचें रहस्य त्यांच्या वर्धमान अशा आध्यात्मिक सामर्थ्यामध्यें व सतत चालू असलेल्या आत्मत्यागामध्यें साठविलेलें आहे. पुष्कळ सार्वजनिक कार्यकर्ते स्वार्थत्याग करतात. परंतु तो स्वार्थ साधण्याकरितां असतो. सपाटून व्याज मिळावें म्हणून एखाद्यानें पैसा गुंतवावा तशातला हा प्रकार आहे. गांधींजींची गोष्ट अगदींच वेगळी आहे. मानासिक औदार्याचे बाबतींत गांधीजी ही एकमेव श्रेष्ठ व्यक्ति आहे. गांधीजींचें जीवन हाच ‘ त्याग ’ ह्या अर्थाचा दुसरा शब्द होय.

सत्ता, संपत्ति, नाव किंवा कीर्ति ह्यापैकीं एकाचीहि अभिलाषा ते मनात धरीत नाहींत. सर्व भारताचें सार्वभौमत्व त्याना द्या, ते ‘ नको ’ म्हणतील, परंतु सिंहासनाचीं रत्ने विकून भुकेकंगालाना ते पैसे वाटून देतील. आपणाजवळ असलेलें द्यावें ही एकच त्यांच्या आत्म्याला लागलेली ओढ असते. आणि त्याबद्दल आभाराच्यासुद्धा परतफेडीची त्याना बिलकूल अपेक्षा नसते. मी त्याना पूर्णपणें जाणत असल्यामुळें मी निश्चित सांगतों कीं, ही अतिशयोक्ति नाहीं.

बादशहा आणि महाराजे, बंदुका व संगिनी, तुरुंगवास आणि नाना तऱ्हेचे छळ, अपमान आणि दुःख, एवढेंच काय, प्रत्यक्ष मृत्यूसुद्धा त्यांची वृत्ति कधींहि खचविणार नाहीं.

गांधीजी मुक्तात्मा आहेत. जर एखाद्यानें माझा गळा दाबला तर मदतीकरिता मी आक्रोश करीन. परंतु गांधीजींचा गळा कोणी दाबला तर माझी खात्री आहे कीं, ते ओरडणार नाहींत. एवढेंच नाहीं, तर गळा दाबणारांकडे पाहून ते हास्य करतील व मरणाचाच प्रसंग ओढवला तर स्मित करीत त्याला ते तोंड देतील.

तत्त्वबोध झालेल्या गांधीजींच्या आत्म्याशीं माझी तुलनाच होऊं शकत नाहीं......एकदां अशी वेळ येईल कीं, ज्यावेळीं गांधीजी जगद्विख्यात

होतील. कारण त्याची व त्यांच्या प्रेम, स्वातंत्र्य व बंधुत्वाच्या संदेशाची जगाला गरज आहे.

महात्माजी हे पौर्वात्य राष्ट्रांच्या आत्म्याचे आदर्श प्रतीक आहेत. कारण मनुष्य हा मुख्यतः आध्यात्मिक जीवन जगणारा प्राणी असावा ही गोष्ट गांधीजी फार परिणामकारक रीतीनें सिद्ध करीत आहेत. ते म्हणतात, मानवी जीवनाचा विकास नैतिक व आध्यात्मिक मार्गानेंच उत्कृष्ट होतो. द्वेष व युद्ध यांच्या वातावरणात त्याचें शरीर व आत्मा निश्चयानें नष्ट होतात. )

या उताऱ्याला From behind the grave ( समाधींतून ) हा मथळाहि क्रॉनिकलकारानीं किती मार्मिक दिला आहे. अशीं अवतरणें योग्य वेळीं देणें हेंच वर्तमानपत्रकर्त्यांचें वैशिष्ट्य आहे. अनेक थोर पुरुषानीं लिहिलेले लेख अगर काढलेले उद्गार हे त्या त्या वेळींहि बहुमोल वाटतात हें खरें, पण एखाद्या विशिष्ट प्रसंगीं ते इतके अचूक लागू पडतात आणि त्यांचें रहस्य अशा आश्चर्यकारक रीतीनें प्रतीत होतें कीं, ते लिहिणाऱ्याच्या अगर बोलणाऱ्याच्या दिव्य दृष्टीविषयीं आपणास कौतुक वाटूं लागतें. वरील उद्गार अशाच प्रकारचे आहेत. महात्मा गांधींसारखा वर्ण्यविषय आणि रवींद्रनाथासारखा कवि असा 'समसमा संयोग' झाल्यावर मग काव्यगंगा दुथडी भरून वाहूं लागली तर त्यांत नवल कसलें ! महात्मा गांधी व रवींद्रनाथ हे दोघेहि थोर पुरुष होत. या दोघानीं भारताचा लौकिक त्रिखंडांत–नवखंडांत पसरविला. प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें पाहतां महात्माजींचें कार्य सर्वांपेक्षा फार मोठें आहे यात शंका नाहीं, तथापि दुरून पाहणाऱ्याला ज्याप्रमाणें दूरचे डोंगर कमी अधिक प्रमाणात सारख्याच उंचीचे वाटतात, किंवा आपणांस आकाशातील तारे एकमेकां-जवळ असले म्हणजे जसे ते सारखेच मोठे भासतात, मग त्यांच्यात कोट्य-वधि मैलांचें अन्तर असो अगर त्यांच्यामध्यें आकाराचा अनन्तपटीनें फरक असो–त्याचप्रमाणें हे दोन महात्मे आपणांस सारखेच पूज्य वाटतात.

वरील उताऱ्यांत गांधींच्या निर्भयतेचें, मुक्तावस्थेचें आणि त्यांच्या विशाल हृदयाचें किती छान वर्णन केलें आहे ! स्थितप्रज्ञाचें वर्णन याहून आणखी तें काय असणार !

## २१-२-४३

आम्ही आज खेळत आहों. आम्ही खेळतों, गप्पा मारतों, विनोद करतों. आज बातमी आहे कीं, गांधीजींची प्रकृति अतिशय गंभीर आहे, त्यांच्या प्रकृतींत फारच बिघाड झालेला आहे. तरीहि आम्ही खेळतों, तरीहि आम्ही गातों, विनोद करतों ? होय ! आम्ही खूप हंसतोंहि ! त्या हंसण्याला कोणी विकट हास्य म्हणोत किंवा त्याला कोणी भयानक हास्य म्हणोत, आम्ही हंसतों एवढें खरें ! विनोद तरी काय कमी आहे ? प्रत्येकाच्या बुद्धीला जणूं धार चढली आहे ! एरवीं शांत राहणाऱ्या जीवांना आज नवीनच स्फूर्ति आली आहे कीं, आपण चार जणांत जाऊन मिसळावें आणि कांहीं तरी करून खूप मनमोकळेपणानें हंसावें. पुस्तकांत डोकें खुपसून बसणाऱ्या किंवा चरख्याभोंवतीं पिंगा घालणाऱ्या मित्रांना आम्ही नेहमीं म्हणत असूं—' अरे, जरा बाहेर पडा, चांगल्या मोकळ्या स्वच्छ हवेंत हिंडा, जरा मनाची करमणूक करा, बाहेरच्या जगाकडे जरा डोळे उघडून आणि हृदय खोलून पहाल कीं नाहीं ? ' आमचें बोलणें सारें पालथ्या घागरीवर पाणी घातल्याप्रमाणें फुकट जात असे. पण आज एकाएकीं या एकलकोंड्या आत्म्यांना दिव्यदृष्टि प्राप्त झाली कीं, ' बाहेर हिंडलें पाहिजे, उन्हांत फिरलें पाहिजे, आपल्या सारख्याच शरीर आणि मन असणाऱ्या प्राण्याशीं बोललें पाहिजे ! नाहीं तर मरून जाऊं ना आपण ! ' या मरणाच्या भीतीनें त्यांच्यात फरक केला ! याच मरणाच्या भीतीनें एरवीं पुस्तकाला सहसा कधींहि हात न लावणाऱ्या चंडोल पक्ष्यांनीं आपली भरारी थांबवून पुस्तकांत चोंच खुपसून आकाश उघडें केलें आहे. हा उलटासुलटा पालट अद्‌भुतरम्य नाहीं का ? जादूशिवाय असले पालट आकस्मिक रीत्या झालेले कुणी कधीं पाहिले आहेत काय ? आतांहि एका जादूनेंच ही सृष्टीची उलटापालट केली आहे ! ती जादू त्या महात्म्याची आहे ! त्याच्या जीवनानें आश्चर्यकारक क्रान्त्या घडवून आणल्याच पण त्याच्या या दिव्यतम तपस्येनें मूक सृष्टीलाहि हालविलें आहे ! नाहीं तर माझ्या खोलीसमोर फुललेल्या आणि आपल्या सुवासानें दशदिशा दरवळून टाकणाऱ्या सब्जाच्या रोपट्यांनीं आमचें सर्वांचें

हृदय प्रसन्न करण्याचें काम एकाएकीं सोडून देण्याचें काय कारण होतें ? आणि वर्षाच्या या प्रसन्न, मधुर, उत्तेजक ऋतुकालांत आपल्या अंगकांतीनें सर्वत्र उज्ज्वल वातावरण पसरवून उल्हास उत्पन्न करण्याऐवजीं चित्र-विचित्र रंगांनीं नटलेल्या फुलांचीं मुखें निस्तेज, मलिन का झालीं असतीं ? पण तरीहि आम्ही स्थितप्रज्ञ आहोंत. पहा, आम्ही काय कमी जोरानें एकमेकाला हाका मारतो ? वा आमच्या मनोविनोदनांत काहीं कमतरता आहे ? आम्ही स्थितप्रज्ञ आहों ! स्थितप्रज्ञाचे श्लोक आम्ही दररोज प्रार्थनेच्या वेळीं नाहीं का म्हणत ! व्यायामाचें सांगनात ना कीं, व्यायाम करताना त्याच्याकडे लक्ष नसलें तरी त्याचा शरीरावर व्हाव-याचा परिणाम काहीं थांबत नाहीं. तसेंच प्रार्थनेचें आहे !

परमेश्वराला वाटत असेल कीं, मी निष्ठुरतेनें मानवाला दडपून टाकलें आहे, त्याच्या मनोभावनांची राखरांगोळी करून टाकली आहे. म्हणून आमच्यासाठीं **रवींद्रनाथांनीं** केव्हांच म्हणून ठेविलें आहे.—

O, you cruel,
You have done well to bring sorrow unto us.
Let your flaming fire burn in my heart :
The incense of my inner temple
Would not send forth its fragrance,
Unless you burn it.
Unless you ignite it, my lamp would not give light,
Without the rude shock of sorrow
Life remains blunt and unconscious.
Sorrow therefore is your own touch
And a reward of my life.

( अरे निष्ठुरा ! आम्हा मानवात दुःखाचा शिरकाव करून देऊन तूं आमच्यावर उपकारच केला आहेस. माझ्या हृदयांत तुझा धडधडणारा अग्नि जळूं दे. माझ्या हृदयमंदिरातील धूपाचा सुवास, त्याला तूं जाळल्या-शिवाय कसा सुटेल ! तूं पेटविल्याशिवाय माझी जीवनज्योत कशी प्रकाश

देईल! दुःखाच्या जोरदार धक्क्याशिवाय जीवन जड व सुप्त राहतें. म्हणून मी दुःख म्हणजे तुझा स्पर्श व माझ्या जीवनाचें पारितोषिक समजतों )

मग परमेश्वराचा हेतु कसा सफल होणार? आणि एकाएकीं आपल्या कडकडाटानें आणि चमचमाटानें आम्हाला घाबरविण्यासाठीं सौदामिनीची त्यानें योजना केली असली तर ती विफलच आहे.

In the darkness of ignorance
I am blind.
It is the light of your Thunder
That burns up the pollution of my soul!

( अज्ञानांधःकारात मी आंधळा असतों. तुझ्या मेघगर्जनातील प्रकाशानें माझ्या अंतःकरणाचा मळ पार जळून जातो. )

* * *

सायंकाळीं प्रार्थनेच्या वेळीं नेहमीप्रमाणें कुरेशीसाहेबानीं कुराणांतील पद्यानें प्रार्थनेस सुरुवात केली. त्याच्याकडे सहज नजर टाकली तरी त्याच्या खोल अन्तःकरणातून ते बोल उठताहेत असें दररोज मला वाटे. शांत, आत्मनिष्ठ भावनेनें ते पद्यगायन करीत. आज त्याचा कंठ सद्गदित झाला. त्याच्या नेहमींच्या स्थिर आवाजाला आज कंप आला. त्या कंपानें सर्वांच्या हृदयाच्या तारा हलल्या. तो मूक आवाज इतका मोठा झाला कीं, त्यानें सर्वांच्या कानठळ्या बसल्या. शरीरांतील सारें रक्त त्याचा प्रतिकार करण्यासाठीं डोक्यांत जमा झालें आहे किंवा काय असें वाटूं लागलें.

त्याच्या पद्यगायनानंतर आम्ही सर्वमिळून गीतेतील स्थितप्रज्ञाच्या वर्णनाचे श्लोक म्हणतों. दररोज सर्वांचा आवाज—खालच्या सुरातलाच—एकत्र मिसळून एक मोठा गंभीर आवाज होत असे. आज तो चांगला बाहेर उमटलाहि नाहीं. कीं तो आम्हाला कुणाला ऐकूं आला नाहीं कुणाला ठाऊक! पण आपोआपच तो मंद झाला होता असें वाटतें! कारण प्रत्येकजण जणूं मनाशींच प्रार्थना करीत होता. त्याला तसें मुद्दाम करावें लागलें नाहीं. त्याला कोठें आपण स्वतः काय करतों याची जाणीव होती!

एरवीं आपल्या मधुर आवाजावर सर्वांना डोलावयास लावणाऱ्या दामु-

अण्णा थत्त्यांनीं आज गायचेंच नाकारलें. त्याना वाटलें, आपल्या घशात कांहीं अडकलें आहे. असें त्याना पूर्वी कधींच झालें नव्हतें! आम्हा डॉक्टर लोकानाहि तपासणी न करताच कळलें कीं, त्याचा आवाज बाहेर पडण्याच्या मार्गात कांहीं विघ्नें आहेत. त्याच्यावर उपचार करण्याची आमची इच्छा नव्हती. आमच्या सामर्थ्याबाहेरची ती गोष्ट आहे!

रात्रीं झोंप लवकर येईना म्हणून बाहेर गेलों, तों चंद्र आकाशात प्रकाशत होता. पण तो आता मावळणार, कां त्याचा प्रकाश असाच कायम रहाणार हें कांहीं कळेना. कदाचित् तो उगवतीकडेच जात असेल!

•

## २२–२–४३

अतीव आशानिराशेचे हेलकावे काय असतात याचा आज आम्हीं अनुभव घेत आहों. सकाळीं कोणी बातमी आणली कीं, गांधींनीं काल दिवसभरात फक्त २ औंसच पाणी घेतलें आणि आता ते दोन दिवसावर जगूं शकणार नाहींत. झालें!! आमच्या हृदयाचें पाणी पाणी झालें! मग काय आम्हीं गांधींना मुकणार! ती कल्पनाच आम्हांला करवेना! मला तर सारें स्वप्नवत् भासूं लागलें. पंधरा दिवसापूर्वी वातावरण कुंद पण शात होतें. एकाएकीं एखाद्या बाजटलीप्रमाणे गांधींच्या उपवासाची बातमी आली आणि झाडांझुडपांप्रमाणें आम्ही उन्मळून पडलों. तथापि त्याच्या उपवासांतून ते सुखरूप पार पडतील अशी एक आशा आमच्या मनात होती. अंधुकपणें मनात वावरणाऱ्या या आशांकुरालाहि सकाळच्या बातमीनें कात्री लावली. प्रचंड तेजोज्योत मावळणार एकूण! फक्त २ च औंस पाणी पोटात गेलें याचा अर्थ त्याना पाणी घोटवत नव्हतें हाच असणार! आणि असें झालें म्हणजे मग प्राण किती वेळ तग धरणार? त्याच्या जोडीला कालच्या वर्तमानपत्रातील His condition is very grave (त्यांची प्रकृति फार चिंताजनक आहे) हे शब्द सारखे कानात घुमत होते. जरी आम्ही सर्वात वाईट बातमी ऐकण्याची तयारी ठेवली होती आणि मन अस्वस्थ

होऊं द्यावयाचें नाहीं असें ठरविलें होतें तरी मनाची तशी प्रत्यक्ष तयारी होणें हें सोपें नाहीं, हें वरील बातमी ऐकतांच आम्हांला कळून आलें. आमच्या निश्चयाच्या पत्त्याचा बंगला वाऱ्याच्या झुळकेसरशी कोलमडून पडला. पण आम्ही आमचें समाधान करून घेतलें; गांधींच्या मृत्यूनेंच जर हिंदी स्वातंत्र्य जवळ येणार असलें तर ! तशीहि परमेश्वराची इच्छा असेल !

दुपारीं वर्तमानपत्रें फार उशीरा मिळतात. आमची आतुरता कोण वाढलेली असते, आणि वर्तमानपत्रें काहीं लवकर मिळत नाहींत ! शेवटीं आज तीं मिळाल्याबरोबर आम्ही गांधींच्या प्रकृतीची बातमी नेहमींप्रमाणेच प्रथम वाचली. सकाळची बातमी तितकीशी खरी नव्हती हें पाहिल्यावर आम्हाला जरा बरें वाटलें. छापलेली बातमी अशी होती, 'गांधींना काल फक्त ४॥ तास झोंप मिळाली, ते मधूनमधून बेशुद्ध ( drowsy ) होतात, हृदयाचे ठोके कमजोर व नाडीहि कमजोर आहे. त्यांनीं काल ४० औंस पाणी आणि २ औंस लिंबाचा रस घेतला. त्यांचा उपवास लवकर सुटला नाहीं तर त्यांना वाचविणें फार कठीण होईल, इ.' एकंदरींत पाणी भरपूर पोटांत जातें म्हणावयाचें तर ! तें चांगलें चिन्ह आहे. अशक्तपणा असणारच. uremia जरा जास्त आहे असेंहि लिहिलें होतें. तें मात्र वाईट आहे. काय होणार आहे कुणाला ठाऊक ? तथापि कां कुणाला ठाऊक, आम्हाला जरा हलकें वाटलें. दुसरीहि एक बातमी होती. तिचाहि आम्हाला जरा आधार वाटला पण तो जरासाच ! अमेरिकेचे प्रतिनिधि मि. फिलिप्स यांनीं वार्ताहरांना सांगितलें कीं, हिंदुस्थानातील गंभीर परिस्थितीबद्दल ब्रिटिश सरकार आणि अमेरिकन सरकार यांच्यांत वाटाघाटी चालू आहेत. त्याच्याच जोडीला अशी बातमी होती कीं, अमेरिकेचे परराष्ट्रमंत्रि मि. कॉर्डेल हल हे ब्रिटिश प्रतिनिधि लॉर्ड हॅलिफॅक्स यांना मुद्दाम भेटले व त्यांनीं हिंदुस्थानांतील वातावरणाबद्दल अमेरिकेला काळजी वाटत असल्याचें सांगितलें. होईलहि कदाचित् परिणाम या जागतिक मताचा, पण आपण फारशी आशा ठेवूं नये हें बरें !

संध्याकाळीं कोणी म्हणाले कीं, गांधी लवकरच सुटण्याचा संभव आहे.

सगळा आशानिराशेचा खेळ आहे झालं! पण एकंदरींत आता हें लिहीत असताना (रात्रीं) माझी वृत्ति जरा आशायुक्त झाली आहे एवढें खरें! पण मी मनाशीं ठरविलें आहे कीं, वाईट बातमी आली तरी फारसें वाईट वाटूं द्यावयाचें नाहीं आणि चांगली बातमी आलीच तर मग होणाऱ्या आनंदाला कोण बंधन घालूं शकणार!

बाकी सध्या हिंदुस्थान जसा हालला आहे तसा कधीं हललेला मी पाहिला नाहीं! हिंदुस्थानातील कोनाकोपऱ्यांतून आवाज उठत आहेत. '**गांधींना सोडा!**' शेकडों, हजारों संस्था आणि प्रमुख व्यक्तींनीं 'गांधींना सोडा' हा घोष चालविला आहे. हिंदुस्थानांत इतक्या संस्था आहेत याचीच कुणाला कल्पना नसेल. व्यापारी, कामगार, विद्यार्थी, स्त्रिया, सर्वांनीं तारा केल्या आहेत, 'गांधींना सोडा!' गांधींच्या राजकीय तत्त्वज्ञानाबद्दल अनेकांचा मतभेद असेल पण त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्वाबद्दल कोणालाच संशय नाहीं. हिंदुस्थानला त्यांची किती गरज आहे याची पुरेपूर जाणीव प्रत्येकाला आहे. सारा देश एकस्वरानें गर्जना करीत आहे, 'गांधींना सोडा!' हिंदीमात्राला वाटत आहे कीं, 'हा महात्मा वाचला पाहिजे!' सभा भरत आहेत, ठराव होत आहेत. पुढाऱ्यांची धावपळ सुरू झाली आहे. सर्वत्र चिंतेचें, आतुरतेचें वातावरण पसरलें आहे. राष्ट्रापुढें एकच प्रश्न आहे,—गांधींचा प्राण वाचविण्याचा. गांधी गेले तर उद्यां काय होईल याची प्रत्येकाला भीति वाटत आहे. त्यांचें केवढें मोठें छत्र हिंदवासियांवर आहे! ते स्थूल शरीरानें लहान असले तरी त्यांच्या सूक्ष्म देहानें, त्यांच्या आत्म्यानें म्हणावें पाहिजे तर, आपल्या विराट स्वरूपानें सारा देश व्यापला आहे. नव्हे, देशाबाहेर, जगांतहि त्यांची व्याप्ति आहे. असा महात्मा पुन्हा पुन्हा होत नाहीं! त्यांना मरण आलें तर आम्ही कोणत्या तोंडानें बाहेर पडणार!

गोलमेज परिषदेला गांधी गेले तेव्हां मी मुंबईंत होतों. त्यांच्या आझाद मैदानावरील विराट् सभेला मी हजर राहिलों होतों आणि त्यांनीं मुंबईचें बंदर सोडलें तेव्हां इतर लाखों लोकांप्रमाणें मीहि तिथल्या गर्दींत बाहेर उभा होतों. बोरीबंदरपासून धक्क्यापर्यंत माणसांची नुसती रीघ लागली होती.

दुतर्फा दोन्ही इमारतींतील सज्जात माणसें दाटीनें उभीं होतीं. रस्त्यातून चालावयाचें म्हणजे एक दिव्यच होतें. इतकी गर्दी झाली होती. सर्वत्र उत्साहाचें वातावरण पसरलें होते. हिंदुस्तानचा दूत आपली कैफियत मांडायला इंग्लंडला जाणार होता. त्याना पाहण्यास आणि पोंचविण्यास आलेली तुफान गर्दी ही राष्ट्राच्या आपल्या नेत्यावर असलेल्या अढळ विश्वासाची आणि दाट प्रेमाची द्योतक होती. त्याच दिवसाच्या सायंकाळच्या ' Evening News ' ( इव्हिनिंग न्यूज ) मध्यें छापून आलें. ' गांधींना अशा प्रचंड प्रमाणावर निरोप देण्यात आला कीं, तसा कोणत्याहि काळात कोणत्याहि राजाला अगर सम्राटाला मिळाला नसेल. मोठमोठ्या सम्राटानाहि हेवा वाटावा असें तें दृश्य होतें '

अनेक प्रसंग असे आठवतात कीं, ज्यावेळीं राष्ट्रानें आपल्या जीवाची त्याच्यावरून कुरवंडी केली. ते कागदावर उतरण्यापेक्षा मनातच राहिलेले बरे वाटतात. या पिढींतल्या सर्वांना त्याची माहिती आहे. मन दुथडी भरून येतें; जें मनात मावणार नाहीं, बाहेर सांडेल तें कागदावर ओतीत आहे एवढेंच !



## २३-२-४३

खवळलेल्या समुद्रात पर्वतप्राय लाटांनीं, त्याच्यावर विहार करणाऱ्या नौकेला आकाशात उंच दूर उडवावें आणि दुसऱ्याच क्षणीं ती जणूं काय समुद्राच्या तळाशीं जाते इतकी खालीं जावी त्याप्रमाणें आमच्या मनाचीं आंदोलनें चाललीं आहेत. मनुष्याचें मन आशेतून एकदम इतक्या निराशेंत जातें आणि निराशेंतून इतक्या लवकर आशेनें प्रफुल्ल होतें हें हल्लींच मी प्रत्यक्ष पाहत आहें. पाणी घातल्यावर एखाद्या वेलीला लगेच टवटवी यावी आणि थोड्याच वेळानें उन्हानें ती करपून गेल्यासारखी दिसावी असा प्रकार चालला आहे. जणूं आमच्या सर्वांच्या आयुष्यातील आशानिराशा या थोड्याच दिवसांच्या अवधींत—जागेंत—कोंबून भरल्या आहेत आणि

त्या दोघी सारख्या बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत आहेत ! एकदा एकीचा विजय होतो तर थोडया वेळानें दुसरी पहिलीवर मात करते. गांधी हे आमच्या सर्वांच्या आयुष्यात किती खोल शिरले आहेत याची खरी कल्पना आता आम्हा सर्वांना येत आहे. आपले नातेवाईक बाहेर अत्यवस्थ आहेत असें ऐकूनहि ज्यानीं आपलें दुःख आवरून मन शांत राखण्यात बरेंचसें यश मिळविलें ते देखील गांधींच्या प्रकृतीचें वाईट वर्तमान ऐकताच गागरून जातात. सुखदुःखाचा हा अनुभव मुद्दाम आणून मिळत नाहीं. ती आढून ताणून आणण्याची वस्तु नव्हे. आम्हाला येथें होणारें दुःख आणि सुख हें सध्या कोठून तरी एकदम येतें आणि कोठें तरी निघून जातें. ( असे लिहिताना मी बिलकूल अतिशयोक्ति करीत नाहीं याची मला जाणीव आहे. जें मला प्रत्यक्ष दिसत आहे तेंच मी लिहीत आहे. ) ज्याचा प्रार्थनेवर विशेष विश्वास आहे, त्यानीं चोवीस तास पाळीपाळीनें भजन, गायन इत्यादि कार्यक्रम चालू ठेविला आहे. ज्याचा प्रार्थनवर विश्वास नाहीं ते त्याचा उपहास करीत नाहींत, त्याची टवाळी करीत नाहींत. त्याना वाटतें, त्याचा विश्वास आहे, ते करतात प्रार्थना ! आपल्या हृदयाची तळमळ ते शांत करतात.

* * *

सकाळीं डॉ. खाडिलकरांच्या खोलींत आपटे गुरुजी आले होते. आमच्यापैकीं एकानें राष्ट्रसेवादलासंबंधीं कांहीं मजकूर लिहून तो आपटे गुरुजींना देण्याकरिता माझ्याजवळ काल दिला होता व मी ती वही त्याना कालच दिली होती. आज त्यानीं ती वही डॉ. खाडिलकराना दाखवावयास आणली होती. डॉ. खाडिलकर हे राष्ट्रसेवादलाचे नाशिक खानदेश विभागाचे प्रमुख असल्याने त्याना ती वही दाखवावी असें साहजिकच गुरुजींना वाटलें. त्याची चर्चा चालू असतानाच मी तेथें गेलों. माझ्याकडेहि पश्चिम खानदेशांतील राष्ट्र सेवादलाच्या कार्याची जबाबदारी असल्यामुळें आणि एकंदरींतच तरुण मुलामुलींच्या संघटनेविषयीं मला आस्था असल्यामुळें मी त्याची चर्चा लक्षपूर्वक ऐकत होतों. सेवादलाच्या स्वयंसेवकाना कवाइतीखेरीज कांहीं सेवाकार्यें शिकविलीं पाहिजेत असें डॉ. खाडिलकर

म्हणत होते. ते म्हणाले, 'नुसत्या कवाइतीला कांहींच अर्थ नाहीं! कवाइतीबरोबरच मुलाना समाजसेवेचीं कांहीं प्रत्यक्ष कामें करावयास तयार केलें पाहिजे. त्यासाठीं social service squads (समाज सेवादलें) असावीं. सेवाकार्यांचे कांहीं भाग करावे. ज्याना साक्षरताप्रसार करण्याची होस आणि शक्यता असेल त्यानीं तें काम पत्करावें, ज्याना सभाची व्यवस्था ठेवणें, जत्रेंत लोकाना साहाय्य करणें अशीं कामें करावयाचीं असतील त्यानीं तीं कामें करावीं. सर्व मुलांकडून सर्व प्रकारचीं कामें होतील अशी अपेक्षा बाळगता यावयाची नाहीं. यासाठीं आपल्या स्वयंसेवकाचे सार्व-जनिक सेवेसाठीं निरनिराळे गट करण्यात यावे आणि त्याप्रमाणें त्याना शिक्षण देण्यात यावें.' गुरुजी म्हणाले, "तुमचें म्हणणें मला पटतें. आणि माझ्या 'राष्ट्रसेवादलाच्या कार्याची दिशा' या लहानशा पुस्तकात मी तशाच सूचना केल्या आहेत, पण प्रत्यक्ष कामाच्या वेळीं निराळाच अनुभव येतो. मागें मी एकदा सेवादलाच्या स्वयंसेवकाना घेऊन एका खेड्यात सहलीसाठीं गेलों. जेथें आमचा कॅंप होता तेथील एका देवळाजवळ खूप दगड अस्ताव्यस्त पडले होते. देवळात जावयास वाटहि चागली नव्हती. मग मी मुलाच्या साहाय्यानें ते सगळे दगड चागले रचले आणि त्यावर माती घालून जागाहि साफ केली आणि देवळात जावयास रस्ताहि चागला करून दिला. मुलाना सेवावृत्तीचें शिक्षण आपोआपच मिळालें. पण येवल्यास परत गेल्याबरोबर मुलानीं ज्यावेळीं आपला कार्यक्रम सर्वांस सांगितला त्यावेळीं इतर मुलें (राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचीं) सेवादलाच्या मुलाना चिडवूं लागलीं. 'आता काय गवंडी काम करणार वाटतं?' साह-जिकच सेवादलाच्या मुलाचा निरुत्साह झाला." डॉ खाडिलकर यावर म्हणाले, 'असेंहि होईल केव्हा केव्हा,' पण माझा असा अनुभव आहे कीं, स्वयंसेवकाना आपल्यापुढें समाजसेवेचीं कार्यें आहेत आणि तीं कर-ण्याची संधि आपणांस मिळते असें दिसलें तर त्याना फार आनंद होतो, त्याना त्यात कमीपणा वाटत नाहीं. उलट जे नुसतीच कवाईत करतात त्याना आपणापुढें दुसरें कांहींच नाहीं याचें वाईट वाटतें.' मग डॉक्टरानीं या बाबतींतील आपले कांहीं अनुभव सांगितले.

काहीं वेळानें डॉक्टर माझ्या खोलींत आले त्यावेळीं पुन्हा या चर्चेला सुरुवात झाली मी म्हटलें, " तुम्ही म्हणता तें बरोबर आहे ! राष्ट्रसेवादल हें नावच सुचवितें कीं, ' दलाचें कार्य राष्ट्राची सेवा करण्याचें आहे. विद्यार्थ्यांच्या संघटनेविषयीं सध्या मी एक पुस्तक लिहीत आहें त्यात मी विद्यार्थ्यांना करता येणाऱ्या समाजसेवेची मीमासा केली आहे. त्यात विद्यार्थ्यांनीं करण्यासारख्या अनेक लहान मोठया सेवाकार्यांचा मी उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, एखाद्या सार्वजनिक हिताच्या संस्थेची वर्गणी गोळा करण्याचें काम घ्या ! काहीं विद्यार्थ्यांनीं हें काम आपल्या अंगावर घेतल्यास त्या संस्थेला कितीतरी सुलभतेनें आपलें कार्य करता येईल. तसेंच दुसरें एक काम म्हणजे गरीब मुलासाठीं कपडे वगैरे गोळा करण्याचें ! धुळयाला आम्ही हें काम करतों. तेथील स्वोद्धारक विद्यार्थीगृहाचीं मुलें आम्हाला या कामीं मदत करतात आणि हजारों जुने पण चागले कपडे आम्हाला नागरिकाकडून मिळतात आणि ते आम्ही खेड्यात आमच्या साक्षरता--प्रसारक शाळा आहेत तेथील मुलाना वाटतो त्याचा फार उपयोग होतो. लोकहि आनंदानें कपडे देतात ही गोष्टहि तितकीच लक्षात ठेवण्यासारखी आहे. अशींच आणखी कितीतरी लहान मोठीं कामें मुलानी सहज थोडा वेळ खर्च करून करता येण्यासारखीं आहेत. " डॉक्टर म्हणाले, ' बरोबर आहे ! पेठ तालुक्यातील दुष्काळपीडित लोकासाठीं आमच्या सुमारें शंभर स्वयंसेवकानीं याच प्रकारचें फार चागलें काम केलें. ' मग मी डॉक्टरना मी लिहीत असलेल्या विद्यार्थ्यांसंबधींच्या पुस्तकाची काहीं माहिती सागत होतों तेवढ्यांत जेवणाची घंटा झाल्यामुळें आणि आज डॉक्टराचीच वाढायची पाळी असल्यामुळें तो विषय तेवढाच राहिला.

. सेवादल हें कोणत्याच राजकीय संस्थेला जोडलेलें असूं नये, पण त्यानें सर्व पक्षाची व सर्व वादाची ( isms ) माहिती द्यावयास हरकत नाहीं, मात्र ती देतांना प्रचाराचा हेतु असूं नये याबद्दल दोघाचेंहि एकमत झालें. माझें पुष्कळ दिवसांपासून तसेंच मत आहे.

२४-२-४३

आज सकाळीं जागा झालों तो एका विस्मयजनक परिस्थितींत ! गांधी म्हणताहेत, 'March ahead' ( पुढें चला ) एवढेंच मी पाहिलें आणि ऐकलें आणि मी जागा झालों. पहाट झाली होती. त्या उत्साहवर्धक शब्दांनीं हुशारी वाटून मी खोलीबाहेर गेलों तों अजून चंद्राचा प्रकाश पूर्णपणें पसरला होता. येथें पहाटे अजूनहि थंडी असते, पण ती हुशारी वाटावी इतकीच ! पहाटेची थंड हवा अंगाला लागताच अगोदरच उल्हसित झालेल्या मनाला फारच प्रसन्न वाटूं लागलें; त्यातच सुंदर चंद्रप्रकाशात सर्वत्र निःस्तब्ध होतें. आमच्यातील काहीं जण पहाटे लवकर उठतात पण अजून ते उठले नव्हते. अतीव सुखदायक चंद्रप्रकाशात फिरण्याचा मोह आवरणें कठीण होतें. सृष्टीचें स्वरूप आनंददायक भासणें अगर त्याचा मनावर कोणताहि परिणाम होणें हें खुद्द मनाच्या परिस्थितीवर अवलंबून असतें हें खरें ! कारण चंद्रप्रकाश काहीं मी आजच पाहत नव्हतों. शुक्ल पक्ष नुकताच संपला. त्यामुळें एक पंधरवडाभर आम्ही शीतल चंद्रिकेचा भरपूर उपभोग घेतला होता पण तो मन दुसरीकडे ठेवून ! त्यामुळे त्याचें सुख वाटले नाहीं. दोन दिवसांपासून पहाटेहि चंद्रप्रकाश आमचें हृदय खुलविण्याचा प्रयत्न करीत आहे. पण आमचें हट्टी हृदय म्हणतें, 'अरे ! आमच्या खऱ्या चंद्राला ग्रहण लागलें असताना तूं तोतया चंद्र मात्र मोठ्या दिमाखानें आकाशात मिरवत आहेस हें काय आम्हाला समजत नाहीं ! आम्हाला माहीत आहे तुझा प्रकाश तूं चोरून आणला आहेस तो!' आज सकाळीं मात्र चंद्रानें आपले खोटें रूप टाकून देऊन कवींनी शतकानुशतकें गायलेलें आणि वर्णिलेलें खरें आल्हाददायक, अमृतस्रावी स्वरूप धारण केलें होतें. त्याच्या प्रकाशांत एरवीं उठून दिसणारीं नक्षत्रें आज कसेंबसें आपलें अस्तित्व दाखविण्याचा प्रयत्न करीत होतीं. चंद्राला 'औषधींचा पति.' कां म्हणतात, हें समजून घ्यायला मला फार विचार करण्याचें कारणच नव्हतें. माझ्या खोलीसमोरील सब्जा आणि पुदीना यांचीं रोपें शुभ्र चंद्र प्रकाशांत न्हाऊन निघालीं होतीं. या वनस्पतींत दशादिशांना दर-

वळून टाकणारा सुगंध निर्माण होतो कुठून असें मला नेहमीं वाटे! आज त्या प्रश्नाचें अचानक उत्तर मिळालें.

गांधींचे जे शब्द मी ऐकले ते झोंपेंतच! अर्थात् माझ्या मनात चालललेल्या खळबळीचेंच तें प्रतिबिंब होते, यात शंका नाहीं. त्यापूर्वी मला झोंप बरी लागलेली होती. एकाएकीं गांधींची हातात काठी घेतलेली मूर्ति मला दिसली आणि त्या मूर्तीच्या तोंडून शब्द निघाले, March ahead (पुढें चला.). लगेच मी जागा झालों. मानसिक व्यापार हे असे मजेदार असतात! माझ्या मनात चाललेल्या विचाराचा तो एक प्रतिध्वनि आहे हें मला अर्थात् समजतें. पण अशाच घटनेला पूर्वी लोक 'दृष्टान्त' झाला असें म्हणत असतील. ('दृष्टान्त', 'दृष्टान्त' म्हणजे असेंच काहींतरी होत असेल.) पण मनोविश्लेषणाचें शास्त्र आहे अगदीं नवीन आणि भाविक, श्रद्धाळु मनाला तें पटणार तरी कसें? मला मात्र गंमत वाटली एवढें खरें!

*　　　*　　　*

आज का कुणाला ठाऊक आमचीं सर्वांचीं मनें गेल्या १०।१२ दिवसांपेक्षा अधिक प्रसन्न आहेत! गांधींची प्रकृति जरा बरी असल्याची बातमीहि छापून आली आहे आणि आम्ही स्वतःहि एका मानसिक उत्कटतेतून काहींसे बाहेर पडलो आहों. आम्हाला आता वाटूं लागलें आहे, 'गांधी खचित जगतील!' शिवाय आता आमचीं मनेंहि जरा जास्त खंबीर झालीं आहेत. त्यामुळें इकडच्या तिकडच्या कमी अधिक चिंतादायक बातमीनें आम्हांला बॅरोमीटरमधल्या पाऱ्याप्रमाणें एकदम हेलकावे बसणार नाहींत असें वाटतें. बाकी काहीं जणाना पहिल्यापासून मनोमनीं खात्री वाटते कीं, गांधी या दिव्यातून पार पडणार! कितीहि वाईट बातमी आली तरी त्याचा विश्वास काहीं कमी होत नाहीं! धन्य आहेत बुवा हे लोक! त्यांचें मन कसें स्वस्थ आहे! याला म्हणावें निष्ठा!

*　　　*　　　*

गांधींच्या उपवासाच्या वातावरणानें लढाईची बातमी सुद्धा आमच्या दृष्टीनें मागें पडली आहे. तुर्की वृत्तपत्र-प्रतिनिधींनाहि या वातावरणानें ग्रासून

टाकिलें आहे. आज त्याची एक महत्त्वाची मुलाखत प्रसिद्ध झाली आहे. तुर्कस्थानचा राज्यकारभार हल्लीं ज्या तत्त्वांवर चालला आहे त्या सहा तत्त्वांचा उल्लेख त्यांनीं केला आहे. लाल पार्श्वभूमीवर सहा शुभ्र बाण काढलेल्या तुर्कस्थानच्या ध्वजाचा ह्याच अर्थ आहे. सहा बाण म्हणजे हीं सहा मूलतत्त्वें ! तुर्कस्थानमधील सर्व राजकीय, सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रांत आणि कायद्याच्या क्षेत्रातहि हींच सहा तत्त्वें आधारभूत समजलीं जातात. तीं सहा तत्त्वें अशीं :—

"(1) Turkey is Republican. The constitution even forbids the Grand National Assembly to modify the articles of the constitution referring to the republican regime. It is the form of Government determined by the revolution and is unchangable.

(2) Turkey is nationalist.

(3) Turkey is democratic. There is only one class in Turkey and that is the Turkish people.

(4) Turkey is centered in the state (Etatism).* The State can, in the name of common interests, find, direct or control all economic, social, industrial and cultural institutions.

(5) Turkey is a secular state (Laisism). Religion is separated from the functions of State. However, Kamalism respects the integrity and liberty of conscience. Every citizen is free to believe in and practise the religion of his choice.

(6) Turkey is revolutionary. This means that Kemalist Turkey did not hesitate to cut itself free from even the strongest traditional influence, when it was a question of executing social and administrating reforms, judged to be necessary in the interests of the nation."

[ "( १ ) तुर्कस्थान हें लोकशाही राष्ट्र आहे. मध्यवर्ति लोकनियुक्त मंड-

ळास देखील लोकशाही राज्यकारभारासंबंधींचीं राज्यघटनेचीं कलमें बदल-
ण्याचा अधिकार राज्यघटनेनें मना केला आहे. क्रांतीनें ती राज्यघटना
ठरविली आहे व ती बदलतां येण्याजोगी नाहीं.

( २ ) तुर्कस्थान हें राष्ट्रवादी आहे.

( ३ ) तुर्कस्थान लोकशाही आहे व त्या ठिकाणीं जनतेचा एक वर्ग
आहे. तो म्हणजे तुर्कस्थानी लोक.

( ४ ) तुर्कस्थानची सत्ता राष्ट्राच्या सरकारच्या स्वाधीन आहे. आर्थिक,
सामाजिक, औद्योगिक व सांस्कृतिक संस्था सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें
स्थापणें, त्यांना सल्ला देणें व त्या ताब्यांत ठेवणें हें सर्व तेथील
सरकार करतें.

( ५ ) तुर्कस्थान हें धर्मप्रधान राष्ट्र नाहीं. राष्ट्राच्या कार्यापासून धर्म
अलग ठेवण्यांत आला आहे. तथापि केमलपाशाच्या तत्त्वज्ञानांत सदस-
द्विवेकबुद्धीचें स्वातंत्र्य व स्वयंपूर्णत्व मान्य केलेलें आहे. प्रत्येक नागरिकास
आपल्या आवडीच्या कोणत्याहि धर्मावर विश्वास व त्याचें आचरण कर-
ण्याचा हक्क आहे.

( ६ ) तुर्कस्थान हें क्रांतिप्रवण राष्ट्र आहे. याचा अर्थ असा कीं,
ज्यावेळीं राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें आवश्यक आहे असें समाजसुधारणेचें
किंवा राज्यकारभारसुधारणेचें कार्य करताना अतिशय प्रबल असें रूढीचें
किंवा परंपरेचें बंधन देखील ताडकन तोडून स्वतंत्र व्हावयाला केमालचा
तुर्कस्थान कधीं कचरला नाहीं. ]"



## २८-२-४३

Jan Valtin (जॅन व्हॅल्टिन) च्या 'Out of the night' ( काळो-
खांतून बाहेर ) या आत्मचरित्रपर ग्रंथास कादंबरीचें रूप देऊन तो
'बादळ' या नांवानें मराठींत प्रा. फडके यांनीं आणला आहे. आज
'बादळ' पुस्तक वाचलें. फडक्यांच्या लेखनशैलीनें या रूपान्तराला कादं-

बरीचें रम्य स्वरूप दिलें आहे. त्यामुळें व मूळ विषयहि मनोरंजक असल्यानें पुस्तक वाचनीय झालें आहे.

या पुस्तकात लेखकानें ( Jan Valtin नें ) तुरुंगातलि आपल्या निवासा-संबंधीं लिहितांना असें म्हटलें आहे :—' बाहेरच्या माणमांची अशी कल्पना असते कीं, तुरुंगात काय, सारे दिवस सारखेच असतील. परंतु ही कल्पना चुकीची आहे. ज्याच्या अंतर्यामीं धडपड आहे, तो तुरुंगात गेला तरी त्याचे सारे दिवस सारखे नसतात. कारण तो काहीं ना काहीं बेत करीत असतो, त्याच्या सिद्धासाठीं झटत असतो. अपयशाची निराशा, यशाचें सुख असा ऊनपावसाचा खेळ त्याच्या जीवितात तिथंहि चालूं असतो.' हा लेखकाचा अनुभव खरा आहे. तुरुंगातील खाणेंपिणें, झोंपणें, फिरणें हा कार्यक्रम जरी बहुतांशीं एकसारखाच असतो तरी हे शरीराचे व्यापार झाले. मनाचे व्यापार नेहमीं बदलत असतात. मनाला जड बंधनें काहीं बाधूं शकत नाहींत. त्यामुळें मन नवीन नवीन बेत नेहमीं रचत असतें, आपल्या कल्पनेनें ते बेत अमलात आणण्याचा प्रयत्न चालूं असतो, वगैरे मनोव्यापाराचें वर्णन अगदीं खरें आहे. माझ्यासारखे जे राजकीय कैदी येथें आहेत त्याच्या बाबतींत तर ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. सर्वांच्या अंतर्यामीं धडपड चालूं आहे, धडपड चालूं होती म्हणून तर त्याना यावें लागलें. बाहेरच्या धकाधकीच्या आयुष्यांत जे बेत पार पडणें शक्य नसतें असे काहीं बेत येथे अमलात आणण्याचा कित्येकाचा प्रयत्न असतो. पुस्तकवाचनाच्या आणि लेखनाच्या बाबतींत तर विशेषतः हें खरें आहे. शिवाय ज्या ज्या सार्वजनिक कार्यांशीं प्रत्येकाचा संबंध असेल त्या त्या कार्यासंबंधींचे नवेनवे कार्यक्रम आखण्यात कित्येक मंडळी गुंतलेलीं असतात. केव्हा केव्हां मात्र सगळयाचाच अगदीं कंटाळा येतो आणि काहीं करूं नये, स्वस्थ पडून राहवें असें वाटतें.

' वादळ ' पुस्तकावरून हिटलरची आणि स्टॅलिनची राजवट कशी आहे याची बरीचशी चांगली कल्पना येते असें म्हणावयास हरकत नाहीं. पण या पुस्तकावरूनच पहावयाचें झालें तर हिटलरच्या National Socialist Party ( नॅशनल सोशॅलिस्ट पार्टीच्या ) कामात क्रौर्य इतका खाजगी स्वार्थाचा पगडा नाझी पुढाऱ्यांवर बसलेला दिसत नाहीं. उलट

लेखकानें लिहिलेल्या वर्णनावरून कॉमिन्टर्नचे बहुतेक कार्यकर्ते आपल्या स्वतःच्या फायद्यासाठीं व प्रतिष्ठेसाठीं काय वाटेल तें करावयास सिद्ध झालेले दिसतात. लेखक स्वतः कॉमिंटर्नचा एक कार्यकर्ता असल्यामुळें आपल्या पक्षातील हे दोष त्याला जास्त अनुभवावयास मिळाले असतील म्हणूनीह असें असेल. क्रौर्याचा उपयोग तर दोन्ही ठिकाणीं सारखाच दिसतो. पण पक्षाच्या 'सभासद' मुलीचा जो उपयोग कॉमिन्टर्नच्या सभासदाकडून राजरोस केला जातो तो वाचून किळस उत्पन्न होते. स्टॅलिननें आणि त्याच्या हस्तकांनीं कॉमिन्टर्नचें जें धोरण जर्मनींत ठेविलें होतें, त्याचा फोलपणा लेखकानें त्याच्या स्पष्ट मताप्रमाणें उघड करून दाखविला आहे. स्टॅलिननें जर्मनींतील 'सोशल डेमोक्रॅट' हे आपले खरे शत्रु मानून हिटलरशीं दोस्तीचें धोरण ठेवण्याचा प्रयत्न केला व त्याच्या साहाय्यानें Social Democrats ना चिरडण्याचा त्याचा बेत होता. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, हिटलर झरझर अधिकाराचीं सूत्रें बळकावूं लागला. (आमच्या हिंदी कम्युनिस्टांनींहि सांप्रतच्या आपल्या धोरणाचा पूर्ण विचार करावा असें मला वाटतें. यापेक्षा जास्त कांहीं मी येथें लिहीत नाहीं.)

या पुस्तकांत 'फिरेलाय'चें चित्र फार उदात्त आणि मनोज्ञ आहे. तिचें जॅनवरील प्रेम हजारों प्राणसंकटातून देखील टिकलें आहे. त्याला कधींच थोडा देखील कलंक लागलेला नाहीं. व्यवहारात अशीं उदाहरणें थोडीं आहेत हेंच वाईट आहे. फिरेलायला प्रथम लेखकानें पाहिलें तेव्हां 'कुठल्या तरी अव्यक्त परन्तु बलिष्ठ शक्तीनें त्या जागीं मला खिळवून ठेविलें होतें' असें तो लिहितो. भवभूतीच्या 'व्यतिषजति पदार्थान् आन्तरः कोऽपि हेतुः' (सर्व वस्तूंच्या अंतरंगांत कांहीं तरी गुण असतोच.) या सुप्रसिद्ध वचनाशीं जुळता असाच वरील विचार आहे. दुष्यन्तानें शकुंतलेला प्रथम पाहिलें तेव्हां 'असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा। यदार्यमस्यामभिलाषि मे मनः॥ (क्षत्रियानें विवाह करण्यास ही योग्य आहे; कारण कीं, माझें सुसंस्कृत मन हिच्याविषयीं आसक्त होत आहे.) असे उद्गार काढले त्यांत त्याच्या मनांतील खळबळीच्या समर्थनाबरोबरच एका अदृश्य पण अनिवार्य शक्तीचीच प्रतीति आली हें स्पष्ट आहे. जॅन व्हॅल्टिननें वर्णिल्याप्रमाणें,

त्याचा अनेक सुन्दर, तरुण मुलींशीं परिचय झाला होता व त्याला त्या सहजप्राप्य होत्या. असें असूनहि फिरेलायबद्दल त्याला अनिवार ओढ लागली आणि ती कायम टिकली. यावरून मनुष्याला केवळ शारीरिक सुख नको असतें, तर त्याला एका सूक्ष्म परंतु त्याचें सर्व आयुष्य व्यापून टाकणाऱ्या सुखाची अपेक्षा असते हें उघड आहे. संकटात सुद्धां तें सुख कमी होत नाहीं. Sons and Fathers (मुलगे आणि बाप) ही मॉरिस् हिंडस्ची कादंबरी मी कांहीं दिवसापूर्वी वाचली. त्यांतील नायक, एक तरुण डॉक्टर ...... आपल्या आवडत्या सखीवर इतकें प्रेम करतो कीं, Marfa Ivanovna ( मार्फा इव्हॅनोव्हना ) हिच्या सुप्रसिद्ध वेश्यागारांतील अत्यंत सुंदर, तरुण, मोहक मुलींचाहि त्याला बिलकूल मोह वाटत नाहीं. तेथें जाऊन उलट तो जास्त अस्वस्थ होऊन चिडतो आणि तसाच परत येतो. तो तेथें असा वागतो कीं, तेथील मुली (अशा कीं, ज्यांच्या सहवाससुखाकरिता रशियांतील मोठे मोठे सेनापति, मुत्सद्दी, लेखक, असे लोक उत्सुक असतात त्या ) त्याच्या उदासीन वर्तणुकीवर आणि बिलकुल मोहित न होणाऱ्या मनावर चिडतात आणि ज्याना मोठ्या मोठ्या पराक्रमी पुरुषांकडून आर्जव करुन घ्यावयाची संवय त्याना आपल्या मादक सौंदर्याचा आणि आपल्या मोहक बांध्याचा या शून्यमनस्क, तरुण डॉक्टरनें उपेक्षा केल्यामुळें जो कमालीचा अपमान वाटला, त्या अपमानानें चिडून त्या त्याला वाटेल तसें बोलतात आणि काहीं मुली तर रडतातहि. एक सर्वांत चांगली म्हणून प्रसिद्ध असलेली मुलगी तर त्याला आपल्या अंगोपांगाचें वर्णन करुन त्याला वैतागानें विचारते, ‘ मी इतकी आकर्षक असतांना का म्हणून तूं माझा स्वीकार करीत नाहींस ? ’ शेवटीं ती हातपाय आपटून वेड लागल्याप्रमाणें करते..तरी त्याला आपल्या सखीची आठवण त्यांच्याबद्दल घृणाच उत्पन्न करिते. त्याच ठिकाणीं एक मुलगी तिच्याकडे कधींकाळीं आलेल्या पण पुन्हां न भेटलेल्या एका साध्या कर्नलसाठीं झुरत असते असें दाखविलें आहे.

यावरून मनुष्याला शारीरिक सुखापेक्षां आपल्या भावनांची तृप्ति करणारें सुख अधिक प्रिय असतें हें उघड आहे. स्त्रीपुरुषांमध्यें प्रेम उत्पन्न होतें तें

कित्येकदा प्रथम दृष्टीनेच उत्पन्न होतें, Love at first sight असें म्हणतात. आणि कित्येक वेळां तें खरें असल्याचा प्रत्यय येतो. 'वादळ' मधील लेखकानें वर्णिलेला फिरेलायच्या आणि त्याच्या पहिल्या भेटीचा प्रसंग तसाच आहे. 'आन्तरः कोऽपि हेतुः' असतो हें अगदीं खरें आहे. मात्र नेहमींच सर्वांच्याच बाबतींत हा नियम लागू असतो असें नाहीं. कांहीं व्यक्तींमध्यें सतत सहवासानें प्रेमाची निर्मिति होते आणि तीहि तितकीच शुद्ध आणि टिकणारी असतें. प्रथमदर्शनीं एकमेकांविषयीं आकर्षण न वाटणाऱ्या व्यक्तींना सहवासानंतर तें आकर्षण उत्पन्न होतें. माझ्या मतें प्रेमी स्त्रीपुरुषांतील आकर्षण हें प्रथम मिश्र असतें. मी असें समीकरण मांडतों : Love=Affection+Passion. स्त्रीपुरुषांतील प्रेम= प्रीति+भोगाशा. पुढें पुढें passion म्हणजे भोगाशा कमी कमी होत जाऊन आंतरिक प्रेम, affection म्हणजे परस्पराकर्षण—शुद्ध प्रेम—वाढत जातें आणि म्हणूनच संसार सुखमय होतो. अर्थात् ज्यांच्यात खऱ्या प्रेमाचा प्रादुर्भाव झाला नाहीं म्हणजे ज्यांच्या आकर्षणामध्यें passion—भोगाशा जास्त बलिष्ठ असते त्यांचें परस्पराकर्षण कालावधीनंतर आंतरिक प्रेमाच्या अभावीं लंगडें पडतें. व त्यांचा संसार त्या मानानें लंगडा पडतो. पहिल्या अवस्थेंत आंतरिक प्रेमापेक्षा भोगाशाच जास्त प्रबल असल्यामुळें तें कळून येत नाहीं ही गोष्ट वेगळी ! अर्थात् सहवासाने आंतरिक प्रेम वृद्धिंगत होण्याचा संभव असतोच. म्हणून 'सहवासोत्तर विवाह' किंवा 'विवाहोत्तर सहवास' आणि 'प्रेमोत्तर विवाह' 'किंवा विवाहोत्तर प्रेम' हे वाद माझ्या मतें सापेक्ष आहेत.

या पुस्तकाच्या शेवटीं फिरेलाय आणि तिचा लहान मुलगा जॅन यांना स्वतः लेखक भेटतो त्या वेळचा प्रसंग मोठा मनोहर आहे आणि तो वाचल्यावर मला शाकुन्तलांतील भरत-शकुंतला—दुष्यन्त भेटीची आठवण झाली. अर्थात् दोन्ही प्रसंगांतील साम्य अल्पच आहे. फार दिवसांनीं पत्नीला व मुलाला पाहणें, प्रथम मुलाला पाहून पितृप्रेम उचंबळूं लागणें आणि त्यानंतर चिंतेनें जर्जर झालेल्या त्याच्या मातेची भेट होणें हे दोन्ही प्रसंगांतील साम्य दाखविणारे विशेष आहेत. शिवाय मुलाला बापाची पूर्वीची

ओळख व संबंध नसतांहि त्याच्याबद्दल एकदम जो आपलेपणा वाटतो तो
व तो आपल्या आईला 'आई हे कोण ग' म्हणून विचारतो हे प्रसंग
शाकुंतलांतील प्रसंगाची आठवण करून देतात हें खरें. निदान मला
तरी त्या प्रसंगाची आठवण झाली. शाकुन्तलात भरत सिंहाच्या छाव्या
बरोबर खेळत असतो आणि येथें जॅन समुद्रकांठावर शेकोटी करण्याच्य
उद्योगात आढळतो. बाकी शाकुन्तलात शकुन्तलेला भेटावयास उत्सुक अस
लेला दुष्यन्त तिला पूर्वी टाकल्यामुळें अपराधी मनानें तिला भेटावयास
येतो तसा येथें प्रकार नाहीं. उलट दोघाची भेट अपेक्षितच असते. म्हणू
नच दोन्ही प्रसंगातील साम्य अल्पच आहे. आणि शाकुन्तलातिल वर्णन
किती बहारीचें आहे! 'वत्स, शकुन्तलावण्यं पश्य (मुला! पक्ष्याचें सौन्दर्य
पहा') असें म्हटल्याबरोबर 'क्वास्ति मे माता' (कुठें आहे माझी आई!)
असें भरत म्हणतो त्यावेळचा प्रसंग किती बहारदार आहे!

* * *

काहीं लोक पुस्तकाची प्रस्तावना वाचण्याची टाळाटाळ करतात. पण
मी ती काळजीपूर्वक वाचतो. प्रा. फडक्यांनीं या पुस्तकाला लहानशी प्रस्ता
वना लिहिली आहे. त्यात त्यांनीं हें पुस्तक मराठींत आणण्याचीं आपलीं
कारणें दिलीं आहेत. तीं देताना आपली जी भूमिका त्यानीं मांडली आहे
ती वाचून मला बरें वाटलें नाहीं. त्यांनीं अशी भूमिका घेतली आहे कीं
जें जें कोणत्याहि राजकीय पक्षात चागलें असें आहे त्याच्या प्रशंसेसाठीं तें
आपल्या ललितशक्तीचा उपयोग करतील आणि वाईट आहे तें "तित
क्याच तीव्रतेनें एखाद्या कादंबरींत चित्रित करण्यास मी कचरणार नाहीं
देशातील कोणत्याहि राजकीय पक्षाच्या सत्कार्याची प्रशंसा करायला मी
सदा जितका उत्सुक असेन, तितकाच त्या पक्षाला बुवाबाजीचें आणि गुंड
गिरीचें स्वरूप आलेलें दिसताच त्याचा धिक्कार करावयासहि असेन. हिंदु
महासभेच्या विचारसरणींतील ग्राह्यांशाचा पुरस्कार करण्यासाठीं मी 'प्रतिज्ञा'
कादंबरी लिहिली, पण महासभेच्या पुढाऱ्यांचा मतलबीपणा व भेकडपण
तितक्याच तीव्रतेनें एखाद्या कादंबरींत चित्रित करण्यास मी कचरणार नाहीं
आशा, प्रवासी, समरभूमि, उन्माद व प्रतिज्ञा, या माझ्या कादंबऱ्यांत कांग्रेसच्य

राजकीय तत्त्वज्ञानाबद्दल व कार्यक्रमाबद्दल मी ठिकठिकाणीं तीव्र नापसंती व्यक्त केलेली आहे, परन्तु काँग्रेसच्या विचारसरणींत योग्य तो पालट होऊन देशोद्धाराच्या खऱ्या धडाडीचा कार्यक्रम तिनें अंगीकारलेला दिसतांच तिचा गौरव करण्यासाठीं माझ्या लेखणीची ललितशक्ति मी आनंदानें खर्च करीन."

यांतील पहिल्या वाक्यांतील भावना योग्य आहेत. कोणत्याहि स्वतंत्र बुद्धीच्या लेखकानें अशीच भूमिका घेतली पाहिजे. तथापि पुढील वाक्यां-मधून फडक्यांनीं जी भूमिका घेतली आहे ती त्याना फार जड पडणारी आहे. त्यानीं आपल्याकडे फारच मोठी न झेंपणारी कामगिरी घेतलीं आहे. स्वतःचें महत्त्व वाजवीपेक्षा अधिक त्यात गृहीत धरलेले आहे. अखिल भारतीय स्वरूपाच्या संस्थाबद्दल दणकून अभिप्राय प्रकट करण्यापूर्वी आपली जबाबदारी ओळखिली पाहिजे. वरील वाक्यातील शेवटचें वाक्य पहा—'काँग्रेसच्या विचारसरणींत योग्य तो पालट होऊन देशोद्धाराच्या खऱ्या धडाडीचा कार्यक्रम तिनें अंगिकारलेला दिसताच तिचा गौरव करण्यासाठीं माझ्या लेखणीची ललितशक्ति मी आनंदानें खर्च करीन.' या वाक्यात उघड होणाऱ्या अहंमन्यतेबरोबरच अज्ञानहि चागलेच प्रकट झालें आहे. फडक्याच्या मतें 'देशोद्धाराच्या खऱ्या धडाडीचा कार्यक्रम' कोणत्याच राजकीय संस्थेनें अंगिकारलेला दिसत नाहीं. फडक्यानीं काँग्रेसवर टीका केली आहे म्हणून त्याचे उद्गार मला आवडत नाहींत असें बिलकूल नाहीं. त्यानीं दुसऱ्या एखाद्या संस्थेबद्दल—हिंदुमहासभेबद्दलहि—असेच उद्गार काढले असते तरी असेंच वाटलें असतें. त्याचे कारण असे कीं, कोणत्याहि तत्त्वप्रणालींतील रहस्य चागलें समजून न घेता आपल्याकडे त्रयस्थाची, एखाद्या वरिष्ठ न्यायाधिशाची भूमिका घेणें हें धाष्टर्याचेंच काम आहे. तें हास्यास्पदहि दिसतें. एखाद्या राजकीय तत्त्वज्ञानाबद्दल मत व्यक्त कराव-याचें म्हणजे तें गंभीरतेनें केलें पाहिजे, निदान फडक्याच्या सारख्या प्रथित-यश लेखकानें तरी. पण त्यांनींच वर उल्लेखिलेल्या 'प्रतिज्ञा' कादंबरींत काँग्रेसबद्दल उपहासाचा सूर काढलेला आहे आणि तोहि तिची भूमिका बिलकूल समजून न घेतां. विचारी व्यक्तीनें चिंतनपूर्वक आपलीं

मतें मांडणें निराळें आणि एका ललित लेखकानें, केवळ आपल्या कादं-बरींत राजकीय वातावरणाचा आभास उत्पन्न करण्यासाठीं वाटेल तीं विधानें करणें हें निराळें. हा दुसरा प्रकार जरा धोक्याचाच असतो. त्यांत जिव्हा-ळ्यापेक्षा व्यापारी वृत्तीच अधिक उठून दिसते.

मला स्वतःला फडक्याच्या कादंबऱ्या आवडतात. पण त्या एक ललित-लेखक म्हणूनच. आपल्या कक्षेबाहेरील प्रांतात ते जो विहार करतात तो सोडून दिला तर त्यांच्या कादंबऱ्या किंवा कोणतेंहि वाङ्मय रम्य व वाचनीय असेंच वाटतें.

* * *

अलीकडे हवा किती छान असते! विशेषतः अगदीं सकाळीं आणि सायंकाळीं फारच सुंदर हवा असते. तुरुंगाच्या शांत वातावरणात अशा वेळीं एका विशेष उल्हासमय वातावरणाची निर्मिति होते, पण तितकीच दुःख-कारकहि वाटते. कारण अशा वेळीं तुरुंगाबाहेरील विश्वाचें सृष्टिसौंदर्याचें नटलेलें चित्र डोळ्यापुढें उभें राहून अनेक जुन्या आठवणी डोळ्यापुढें उभ्या राहतात आणि मग आपण परतंत्र आहों हें मनात येऊन काहींशी उद्विग्नताहि वाटते.

श्री. **नवल पाटील** ( माजी अध्यक्ष, पश्चिम खानदेश जिल्हा कॉंग्रेस-कमिटी ) मोठे उद्योगी आहेत. त्यांचा दररोजचा फिरण्याचा व्यायाम, सूत कातणें, वाचन हें नियमित चाललेलें असतें. मला वाटतें त्यांच्याइतका फिरण्याचा व्यायाम सबंध तुरुंगात दुसरा कोणी घेत नसेल. पण हा व्यायाम चालू असतानाच मध्येंच एकदां कुठेंतरी खोलीकडे वगैरे जाऊन येण्याची त्यांची लकब आहे. ते अगदीं सरळ मनाचे गृहस्थ आहेत.

**श्री.भाऊसाहेब हिरेहि** अत्यंत नियमित असतात. सकाळचें व्यवस्थित फिरणें, एकसारखें बारीक सूत, उर्दू वाचन वगैरे त्यांची कांहीं विशेष वैशिष्ट्यें आहेत. त्यांचा निगर्वी, सरळ स्वभाव, उद्योगप्रियता, तळमळ यामुळें त्यांच्याविषयीं सर्वांचा अनुकूल ग्रह होतो. त्यांची राहणी व्यवस्थित आहे. बराकमध्यें चोपड्याच्या **मगनशेटांच्या** जोडीला भाऊसाहेब हिरे आणि कळवणचे डॉ. **ओझा** हे सूत काढणारे प्रवीण लोक आहेत.

सर्वांचे निश्चित कार्यक्रम अखंड चालले आहेत. आयुष्याच्या मार्गावरील आम्ही सर्व प्रवासी आहोत. ऐतरेय ब्राह्मणात 'चरैवेति चरैवेति' अशा पालुपदाचे कित्येक श्लोक आहेत, त्यातील रहस्य किती उत्तम रीतीनें पटतें!

> चरन्वै मधुविन्दति चरन् स्वादुमुदुम्बरं ।
> सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तन्द्रयते चरन् ॥

(फिरलें असताना मध मिळतो. फिरलें असताना अंजीर मिळतो. कधींहि आळस न करणाऱ्या सूर्याचा मोठेपणा पहा.)

●

## २७-२-४१

कालच मी सुटी घेतली होती. म्हणजे नेहमीच्या वेळापत्रकाप्रमाणें काहींहि केलें नाहीं. एकतर मला तितकेंसें बरेंहि वाटत नव्हतें आणि मधून मधून विश्रांति घेतलेली बरी. पाश्चिमात्य देशात दर आठवड्याचा शेवटचा दिवस नित्य कर्मापासून मोकळीक करून घेण्यासाठीं वापरतात. ती पद्धत फार चागली आहे. मोठे मोठे राजकारणी पुरुष, लेखक, अधिकारी वगैरे समाजाच्या सर्व थरातील लोक weekend चा उपभोग घेतात. अर्थात् ज्याच्या त्याच्या शक्तीप्रमाणें प्रत्येकजण आपली व्यवस्था करतो. श्रीमंत लोक तर आपल्या खेड्यातील घरीं अगर एखाद्या रम्य स्थलीं आपला दिवस घालवितात किंवा नौकेवर सारा दिवस घालवावयाचीहि काहीं लोकाची पद्धत असते. नित्यकर्मापासून मोकळीक मिळाल्यानें आठवडाभर काम करून श्रांत झालेल्या शरिराला व मनाला जरुर ती विश्रांति आणि पालट मिळतो आणि पुन्हां पुढें कामाला लागण्यासाठीं हवा असलेला ताजेपणा आणि उत्साहहि प्राप्त होतो. अशी विश्रांति न घेतल्यास लवकरच मनुष्याचें शरीर आणि मन कमजोर होण्यास काहींच अडचण राहत नाहीं. याचें अगदीं चागलें उदाहरण म्हणजे आपल्याकडील सरकारी आणि खाजगी संस्थांतील नोकरवर्ग! एखाद्या वरिष्ठ अधिकाऱ्याला स्वतःच्या वेळाची

आवड असेल तर सायंकाळीं लवकर कचेरी बंद व्हायचा तरी संभव, नाहीं तर त्या अधिकाऱ्याबरोबर यानाहि रात्र होईतों कुचंबत बसावें लागतें. मी तर असे कित्येक कारकून पाहिले आहेत कीं, ज्याना खरोखर कचेरींत सायंकाळीं ५ नंतर बसण्याची तशी गरज नसते. पण केवळ वरिष्ठ अधिकारी रात्रीं नऊ नऊ वाजेपर्यंत कचेरींत बसतो म्हणून त्यानाहि बसावें लागतें आणि पुन्हा सर्वांना घरीं काम करावयास म्हणून फाइलेंच्या फाइलें न्यावीं लागतात ती गोष्ट वेगळीच. रेव्हिन्यूसारख्या काहीं खात्यांतील काम तर मारुतीच्या शेंपटाप्रमाणें कधींच संपण्यासारखें नसतें आणि ज्यात स्वत:ला काहींहि रस नसतो अशीं रुक्ष कामें करण्यात दिवसाचा घरचा वेळ सुद्धा पुष्कळसा घालवावा लागतो. कचेरींत जाताना आणि तेथून घरीं परत येताना केव्हाहि पहा, त्याच्या खाकेंत कागदाचें एक लट्ठ भेंडाळें असावयाचेंच ! मला त्याची नेहमीं कींव येते ! या लोकाना दररोज कचेरींत आणि घरीं सारखें राबावें लागतें तें लागतेंच पण शनिवारीं–रविवारीं तरी काहीं सुटी मिळावी, पण तीहि व्यवहारात त्याना मिळत नाहीं. इंग्रज सरकारच्या राज्यात सर्वत्र रविवारची पूर्ण सुटी कायद्यानें देण्याची व्यवस्था कागदावर केली आहे. त्याशिवाय त्याला जोडून शनिवारचाहि अर्धा दिवस सुटी देण्यात येते. पण ती कोणाला ? वरिष्ठ अधिकारी असेल त्याला ! इतराना बहुधा रविवारीं देखील कचेरींत जाऊन दररोजइतकें नाहीं तरी भरपूर काम करावें लागतें. आणि कित्येकाना तर महत्त्वाच्या सणाच्या दिवशींहि साहेबाकडून ऑफिसमध्यें कामासाठीं बोलावणें आलेलें मी पाहिलें आहे. वर्षानुवर्षे या बिचाऱ्याना विश्रांति कशी ती ठाऊक नसते आणि त्याचा व्हायचा तोच परिणाम त्याच्या शरीरावर आणि मनावर होतो. आणि मग त्या सर्वांचा परिणाम कुटुंबातील साऱ्या माणसावर आणि व्यवहारावरहि होतो. किती शोचनीय अवस्था ही !

पुण्याला मी शिकत असताना एका चित्रपटगृहाच्या प्रांगणात वजन करण्याचें एक यंत्र होतें. त्यावर वजनाप्रमाणेंच मुठीनें दोन handles (मुठी) दाबून प्रत्येकाच्या अंगची शक्ति अजमावता येत असे. तेथें एकदा समाजातील सर्व वर्गांच्या नागरिकांकडून तो प्रयोग करवून शारीरिक

शक्ति व सहनशक्ति याचे अनुक्रम लावले होते. त्यात पहिला नंबर खला-शाचा, त्यानंतर सैनिकाचा, याप्रमाणें होता होता सर्वांत खालचा नंबर कारकुनाचा लागलेला दिसला. शिक्षक त्याच्या जरासे वर होते. आणि आपल्याकडील शिक्षकाची परिस्थिति तरी काय विशेष चांगली असते? घरीं तपासायच्या वह्या पाहिल्या तरी छाती दडपून जायची पाळी येते! काहीं सरकारी अधिकारी मात्र मी असे पाहिले आहेत कीं, जे बरोबर ११ अगर ११॥ ला कचेरींत येतात आणि सायंकाळीं ५ अगर ५॥ ला (जी वेळ ठरली असेल त्याप्रमाणें) कचेरींतून बाहेर पडतात आणि आपल्या हाताखालच्या नोकरानाहि घरीं जावयास सांगतात. पण असे महात्मे फार थोडे! यांपैकीं नियमितपणाचें महत्त्व जाणणारे काहीं असतात, तर बाकी-च्याना संध्याकाळचा वेळ बाहेर घालविण्यानें मिळणाऱ्या आनंदाची जाणीव असते आणि आपणाप्रमाणेंच हाताखालच्या नोकरानाहि तो आनंद मिळावा अशी त्यांची सदिच्छा असते. यांत ज्याना बाहेरचे टेनिससारखे खेळ खेळण्याची हौस आहे अशांचा भरणा विशेष असतो.

विश्रांतिदिनाबद्दल लिहिता लिहिता, नेहमीं माझ्या मनांत येणाऱ्या या सगळ्या गोष्टी आठवल्या. रविवार नाहीं, सण नाहीं, अशी या लोकांची अवस्था! त्यामुळे शरीर आणि मन यांस लागणारी विश्रांति त्याना कुठून मिळणार? पण अशा विश्रांतीची गरज असते हें खरें! गांधींच्या मौनाचा हाच उद्देश आहे आणि ज्यानें ज्यानें नियमित काळ विश्रांतिसुखाचा अनुभव घेण्यांत खर्च केला असेल त्याला त्याला त्याचें महत्त्व कळल्याशिवाय राहणार नाहीं. युरोपियन देशांत आणि विशेषतः जर्मनींत तर सुटीचे दिवस स्त्रीपुरुषाना आनंदात घालविता यावे म्हणून मोठाल्या योजना केलेल्या असतात. शहरा-पासून दूर अशा जागीं एखाद्या निसर्गरम्य स्थानीं जगाला विसरून नेहमीच्या आयुष्यापासून अगदीं निराळ्या प्रकारचें आयुष्य घालविण्याच्या सोयी येथें केलेल्या असतात. पोहणें, सायकलींवर बसणें, घोड्यावर बसून रपेट करणें, धावणें, उड्या मारणें, खेळ खेळणें इत्यादि करमणुकीच्या साधनांची व्यवस्था तर असतेच असते. पण कोणाला एकटयानेच शांतपणें दिवस काढावयाचा असल्यास त्याच्यासाठीं सर्व सोयींनीं पूर्ण अशीं निर्जन स्थानें

राखून ठेवलेलीं असतात. एरवीं धावपळीचें आयुष्य काढावें लागणाऱ्याहि कित्येक लोकांना एखाद्या खरोखरीच 'आराम' देणाऱ्या आरामखुर्चीवर अगर नावेवर बसून काहींहि शारीरिक हालचाल न करता अगदीं स्वस्थपणें आपला दिवस काढावासा वाटतो, तर ज्यांना खुर्चीवर नेहमीं बसून बसून बैठें काम करण्याचा कंटाळा आलेला असतो, ते निरनिराळ्या खेळांत आणि धावपळींत भाग घेत असतात. बर्लिननजीकच्या Siemendart (सीमेंडार्ट) या प्रचंड कारखान्यांतील मजुरांसाठीं सुद्धा किती सुंदर योजना केली आहे हें मी Physical Education in Germany (जर्मनींतील शारीरिक शिक्षण) या ब्रिटिश प्रतिनिधींनींच लिहिलेल्या छोट्या पुस्तकांत वाचलें. तेव्हां युरोपीय राष्ट्रें आपल्या नागरिकांकरिता किती चांगल्या चांगल्या सोयी करतात, हें पाहून आणि आमच्या राष्ट्रांतील सर्वच मानवी शक्तिबुद्धीची कशी खच्ची होत आहे हें मनांत येऊन मन उद्विग्न होतें.

या तुरुंगांतील जीवनांत काम तें काय असणार आणि त्यांत विश्रांतीची जरूर ती काय; सगळी अखंडविश्रांतीच आहे, असें कित्येकांना वाटतें. ज्यांचे सगळे दिवस असेच गप्पांत आणि खेळण्यांत जात असतील त्यांना कदाचित् नियमित विश्रांतीची गरज वाटणार नाहीं. पण ज्यांनीं येथेंहि आपल्या आयुष्याला एक वळण लावलें आहे आणि आपले तुरुंगांतील दिवस कसे घालवावे हें ठरवून टाकलें आहे त्यांना विश्रांतीची गरज आहेच. आमच्यांत असे काहीं आहेत कीं, जे इतरांबरोबर बोलतात, गप्पा मारतात, खेळतात, सर्व काहीं करतात, पण त्यांतच सारा दिवस घालवीत नाहींत. आपल्या दिवसांतील तासांची त्यांनीं व्यवस्थितपणें विभागणी केलेली असते आणि आपल्यावर निरनिराळी जबाबदारी लादून घेतलेली असते. त्या मंडळींना मात्र मधून मधून विश्रांतीची गरज असते. तसा बहुतेक कोणीहि आपला वेळ नुसत्याच अनुत्पादक गोष्टींत घालवीत नाहीं. प्रत्येक-जण आपापल्यापरी काहींना काहीं कामांत गुंग असतोच. कोणी नियमित-पणें सूत काढतात, कोणी वाचतात, कोणी लिहितात. कोणी कोणी पर-भाषांचा अभ्यास करतात आणि कित्येकजण 'निरनिराळ्या राष्ट्रसंवर्धक

कार्यक्रमाची चर्चा करतात. तेव्हां अगदींच रिकामटेकडा येथें क्वचित्च कोणी असेल.

मीहि माझ्यासाठी कांहीं विशिष्ट कार्यक्रम आखला आहे. म्हणून मधून मधून एखाद्या दिवशीं विश्रांति घेऊन शीण घालवावा आणि एक दिवस मजेंत घालवावा असें ठरविलें आहे. त्या दिवशीं कांहीं लिहावयाचें नाहीं, वाचायचें नाहीं, नित्यापैकीं कांहींच करावयाचें नाहीं. असाच इकडे तिकडे वेळ काढावयाचा, जे माझ्यासारखेच त्या दिवशीं रिकामे असतील त्यांच्याशीं गप्पा मारावयाच्या, नवीन नवीन ओळखी करून घ्यावयाच्या आणि वाटल्यास झोंपहि घ्यावयाची. शक्यतोंवर आपल्या खोलीच्या आणि जुळलें तर आपल्या बराकच्या बाहेर वेळ घालवावयाचा असा बेत आहे. असें केलें म्हणजे मग पुन्हां दुसरे दिवशीं नित्य कामाला उत्साह वाटतो असा मला अनुभव आहे पुष्कळांना असेल ! मात्र अजून मी विश्रांतीसाठीं कोणताहि एक दिवस असा निश्चित केला नाहीं. कंटाळा आला कीं, विश्रांति घेतों, पण आत आठवड्यांतून कोणता तरी एक दिवस ठरविला पाहिजे !

*　　　*　　　*

काल असाच सहज चौथ्या यार्डांतून हिंडत होतों. श्री. वामनराव मुकादम आपल्या खोलींत दोन भल्या लठ्ठ वह्या घेऊन कांहीं तरी लिहीत बसले होते. मला पाहतांच ते थांबले आणि हंसले. 'काय लिहितांय सध्यां असें म्हणत मी आत गेलों. मात्र त्यांचा वेळ घ्यायची माझी इच्छा नव्हती पण त्यांनीं आग्रहानें मला बसविलें आणि ते माझ्याशीं गप्पा मारूं लागले श्री. वामनराव मुकादम हे मुंबई विधिमंडळांतील कॉंग्रेस पक्षाचे प्रतोद होते स्वराज्य पक्षापासून त्यांचा कौन्सिलशीं संबंध आहे. कित्येक वर्षें ते गुजरात मध्येंच गोध्रा येथें स्थायिक झाले आहेत. त्यांचे केस पांढरे झाले असले तरी शरीरप्रकृति चांगली दिसते आणि त्यांच्या गंभीर चेहऱ्यावरून आणि सावकाश सावकाश बोलण्यावरून कल्पना येणार नाहीं कीं, त्यांचा स्वभाव अत्यंत विनोदी आहे. बोलतां बोलतां चांगला विनोद करतात ते ! येथे दिवाळींत आम्ही गाण्याचा वगैरे कार्यक्रम केला होता तेव्हां वामनरावांनी

छान नकला करून सर्वांना हंसवून सोडलें होतें आणि विधिमंडळातील गमती बऱ्याच सांगतात ते! त्या ऐकून कोणासहि हंसूं आल्यावाचून राहणार नाहीं.

सध्या ते '**राणा प्रताप**' यांचें चरित्र लिहीत आहेत. अर्थात् गुजरातींत! यापूर्वीं त्यांनीं **श्रीशिवाजी महाराजांचेंहि** एक विस्तृत चरित्र लिहून प्रसिद्ध केलें आहे. बरेंच मोठें आहे तें पुस्तक आणि 'राणा प्रताप'चें चरित्रहि तितकेंच मोठें होईल म्हणतात. वामनराव मला म्हणाले, 'येथें जेलमध्यें काहीं तरी व्यवसाय पाठीमागें लावून घेतला म्हणजे बरें असतें, वेळ चांगला जातो; मग त्यांनीं आपण लिहीत असलेल्या चरित्राबाबत काहीं काहीं मजेदार गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले, 'काहीं लोकांच्या मतें रजपूत लोक हे हूण लोकांचे वंशज आहेत. पण माझी पक्की खात्री झाली आहे कीं, रजपूत हे आर्यवंशाचेच आहेत.' मी म्हटलें, 'रजपूत हे सिथियन लोकांचे वंशज आहेत असेंहि काही लोक म्हणतात ना?' ते म्हणाले, 'म्हणतात, परन्तु तसें काहीं नाहीं. रजपूत आर्यच आहेत.' ते पुढें म्हणाले, 'Guerilla warfare म्हणजे गनिमी काव्याचें युद्ध ज्याला म्हणतात तें प्रतापनें शोधून काढलें असें माझें मत आहे!' **अकबर आणि औरंगजेब** यांत औरंगजेब फार श्रेष्ठ होता, अकबर फार वाईट होता असेंहि ते म्हणाले. औरंगजेबानें हिंदूना त्रास दिला तेव्हां एकानें विचारल्यावरून औरंगजेबानें असें उत्तर दिल्याचें त्यांनीं सांगितलें : 'हा माझा दोष नाहीं. दोष कोणाचा असेल तर मौलवी आणि मौलानाचा आहे. त्यांनीं माझा धर्म जसा मला शिकविला तसा मी अमलांत आणीत आहे. धर्मप्रमाणें वागणें हें माझें काम आहे आणि मला जसा धर्म शिकविण्यांत आला तसा मी वागत आहें.' 'औरंगजेब व्यक्तिशः फार साधा आणि चांगला होता' असें ते म्हणाले. जेवणाची घंटा झाल्यानें आमचें तें बोलणें तेवढयावरच थांबलें.

वामनरावांनीं लिहिण्याकरिता मोठ्या मोठ्या वह्या बांधवून त्यावर क्रमांक घालून त्या आणल्या आहेत. सुट्या कागदापेक्षा ती पद्धत चांगली आहे असें मला वाटतें. पण काहीं वेळ मला सुट्या कागदांवरच लिहिणें आवडतें. मग ते क्रमवार लावून एकत्र शिवता येतात. वामनरावांच्या बरोबर बोलण्यासाठीं पुन्हां एकदां जाण्याचा माझा बेत आहे.

आज वर्तमानपत्रात श्री. अणे याचा नागपूर स्टेशनवर सैनिकांनीं अपमान केल्याची बातमी वाचली. स्टेशनमास्तर, पोलिस या कोणाचेहि न ऐकता सैनिक, अणे यानीं रिझर्व केलेल्या डब्यात बसले म्हणे ! आणि मग अणे याची सोय इतर ठिकाणीं करावी लागली ! पण मी म्हणतों असें का? एवढा अपमान अण्यानीं का सहन करावा ? त्यानीं साखळी ओढून गाडी चालूच द्यावयाची नव्हती आणि स्टेशनमास्तरनेंहि गाडी सोडायचीच नाहीं. आमच्याच देशात आमच्यावर हा जुलूम ? आणि तोहि अण्यासारख्या अ. भा. प्रतिष्ठित पुढाऱ्यावर ! ते नुकतेच व्हाइसरॉयाच्या कार्यकारी मंडळाचे सभासद आणि Leader of the House ( सभागृहाचे पुढारी ) होते कीं ! साध्या शिपायानीं एवढया मोठ्या पुढाऱ्याचा असा अपमान करण्यास धजावें, हे आश्चर्यच आहे ! मागें त्रिवेदी या सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्याच्या बाबतींतहि असाच प्रकार घडला. आणि लहान सहान लोकाच्या बाबतींत तर किती प्रकार घडत असतील कोण जाणे. **गोविंदराव देशपांडे** म्हणाले, ' मागें **हसन इमाम** ( सर अली हसन इमाम ) याच्या बाबतींत असाच प्रकार घडला तेव्हा ते इंजिनापुढें रुळावर जाऊन उभे राहिले आणि त्यानीं गाडीच जाऊं दिली नाहीं ! आपल्या लोकानी असेंच तेज दाखविलें पाहिजे. ' जाऊं दे ' अशी वृत्ति सोडली पाहिजे. रेलवे पोलिस काय गरीब उतारूंना त्रास देण्यापुरतेच आहेत वाटतें आणि स्टेशन मास्तरचें काम नाहीं का उतारूंच्या हक्काचें संरक्षण करण्याचें ? खरें म्हटलें म्हणजे त्यानें आपल्या कामात हयगय केली म्हणून त्याला शिक्षाच व्हावयास पाहिजे.

* * *

**गांधींची** प्रकृति बरी असल्याचें दिसतें. आणखी ३।४ दिवस आहेत उपवास सुटायला.

२८-२-४३

चोरड्याचे श्री. मगनशेट याची खोली माझ्या खोलीपासून फारशी लांब नाहीं. आज त्याच्या अंगातील पाढरा शुभ्र शर्ट आणि तशीच अर्धी विजार पाहून बरेंच दिवसात मनात असलेला प्रश्न मी त्याना विचारला, तुम्ही बाहेर कधीं असे कपडे घालता का ? ते म्हणाले हो, 'मी घरीं असलों म्हणजे असेच हलके कपडे घालतों. कोठें बाहेर जावयाचें असलें म्हणजें धोतर नेसतों आणि कोट तर क्वचित्च घालतो.

मगनशेट हे मोठे नमुनेदार गृहस्थ आहेत. ते खानदेशचेच रहिवासी असल्यानें अर्थात् त्याची व माझी बरेच दिवसापासून ओळख आहे. धुळ्याच्या न्यू प्रताप मिलचे ते एक डायरेक्टर असल्यानें धुळ्यालहि ते मधून मधून येत असतात आमच्या घरींहि येतात. पण त्याची खरी कल्पना मला येथें त्याचा निकट सहवास घडल्यानंतरच आली.

येथें कोणाच्याहि चटकन् लक्षात येणारी गोष्ट म्हणजे ते आपल्या कार्यक्रमात नेहमीं दंग असलेले दिसून येतात ही होय. आपले कपडे आणि भांडीं ते स्वतःच धुतात आणि इतरापेक्षा त्याची भांडीं चकचकीत आणि कपडे पाढरे शुभ्र असतात. ते स्वतः श्रीमान् आहेत. तथापि चोपड्यास घरीं असतानाहि कोटाखेरीज आपले कपडे धुण्याची त्यांची संवय आहे. नियमित वेळेला ते येथें आपले कपडे धुताना आणि भांडीं घासताना दिसतात. दररोज नियमित व्यायाम करीत असल्यामुळें त्याची शरीरयष्टि चागली आहे आणि केव्हाहि पहा, त्यांच्या चेहऱ्यावर तजेला आणि उत्साह हीं दिसून येतात. ते कोठ-ल्याहि वादाच्या भानगडींत पडत नाहींत आणि चुकूनहि अपशब्द बोल-ण्याची त्याची संवय नाहीं. सर्वांशीं ते चागले हंसून खेळून वागतात आणि सर्वांना त्यांच्याविषयीं आदर आहे.

पण त्याचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य निराळेंच आहे. खादीशास्त्रात ते मोठे प्रवीण आहेत. सूत काढण्याच्या आणि चरख्याच्या तंत्राच्या बाबतींत तर ते इतके प्रवीण आहेत कीं, मी त्यांना 'चरखाचार्य' ही पदवी बहाल केली आहे. येथें गावोगावचे इतके कार्यकर्ते आहेत पण कोणाचाहि चरखा

चागला चालेनासा झाला किंवा दुसरी कोणतीहि अडचण सूत काढण्याच्या बाबतींत आली कीं, तो आपला जायचा मगनशेटजींकडे ! आणि तेहि प्रत्येकाला त्याचें काम करून देतात. चरख्याबाबत अगदीं लहानसहान गोष्टींचें सुद्धा त्यांनीं शास्त्रच बनविलें आहे आणि ते म्हणतात, ' प्रत्येक गोष्ट अगदीं पद्धतशीरपणें केली नाहीं तर तिचा कांहींच उपयोग व्हायचा नाहीं. त्याच्याजवळ चरख्यासाठीं सगळीं अवजारें चांगल्या स्थितींत ठेवलेलीं आढळून येतील. त्या साहित्याची त्यांनीं एक लहानशी पेटीच केली आहे. त्यात लहान मोठया कितीतरी वस्तू असतात. त्याचा स्वतःचा चरखा नेहमीं घासूनपुसून स्वच्छ ठेवलेला असतो आणि माळ किती लांब असावी, त्राक कशी बसवावी, चरखा कसा ठेवावा या लहानसहान पण महत्त्वाच्या गोष्टींची ते सशास्त्र, कारणासह माहिती देण्यास तत्पर असतात. चरख्यावर त्याची फार निष्ठा आहे. ते येथें दररोज १००० वार सूत कातताात. अगदीं नियमितपणें ! कधींहि चुकत नाहींत. येथें आल्यावर गेल्या महिन्यात त्याचें जवळजवळ दोन लाख वारावर सूत झालें आहे. त्याचे बहुतेक कपडे स्वतः काढलेल्या सुताचेच आहेत. तेहि त्यांनीं दाखविले. ते म्हणाले, ' दररोज एक तास जर नियमितपणें सूत काढलें तर आपले स्वतःचे १ वर्षाचे कपडे सहज निघतात हा माझा अनुभव आहे. आता मी येथें काढलेल्या सुताचे कपडे घरच्या लोकांसाठीं करीन इतकें माझें सूत काढून होतें. त्यात कांहीं फारसा वेळ जात नाहीं. पण नियमितपणा मात्र लागतो. '

मगनशेटाच्या बद्दल आदर वाटायला दुसरें एक कारण असें कीं, ते अभ्यासू वृत्तीचे आहेत. त्याचें शाळेंतील शिक्षण इंग्रजी चौथ्या इयत्तेच्या पलीकडे गेलें नाहीं. पण त्यांनीं अभ्यासानें आपलें इंग्रजीचें ज्ञान उत्तम वाढविलें आहे. इंग्रजी, मराठी, सर्व प्रकारचीं चांगलीं पुस्तकें ते नियमितपणें वाचतात आणि जरूर तेथें टिपणेंहि करतात. अमळनेरचे श्री. प्रतापशेठ यांच्याबरोबर त्यांनीं युरोपची यात्रा केली आहे.

* * *

गांधींची प्रकृति तशी बरी दिसते. पण आज ते तितके आनंदी व उत्साही नव्हते असें छापून आलें आहे. पण एकंदरीनें ते उपवासातून सुख-

रूपपणें बाहेर पडतील असा विश्वास वाटतो. आम्हाला आता तसें हलकें वाटत आहे.

•

## १-३-४३

गांधींची प्रकृति चागली असल्याचें दिसतें. आता कांहीं काळजी नाहीं.

अजून सभा आणि ठराव चाललेच आहेत. या उपवासानें एवढें जरी सिद्ध झालें कीं, सरकार हिंदुस्थानात लोकमताला बिलकूल मान देत नाहीं आणि कोणत्याच पक्षाचा बडेजाव करण्याची त्याची इच्छा नाहीं तरी सुद्धां पुष्कळ झालें. आपणास सर्व पक्षाची एकी केली पाहिजे. स्वयंनिर्णयाचा हक्क मुसलमानास द्यावयास काय हरकत आहे ! **राजगोपालाचार्य** म्हणतात तें कांहीं वेळा पटूं लागतें कीं, दोघानीं—म्हणजे हिंदु आणि मुसलमान यानीं—एकमेकाचा अविश्वास बाळगून दुसऱ्याच्या सत्तेखालीं कृत्रिम आणि बळजबरीची एकी राखण्यात काय अर्थ आहे ? त्यापेक्षा पृथक् पण स्वतंत्र राहण्यात कांहीं अर्थ आहे. मुसलमानाना पाकिस्तान वाटतें तितकें अंमलात आणणें सोपें नाहीं, आणि त्यानीं तें अमलात आणलेंच तर भिण्याचें एवढें काय कारण आहे ? इतके हिंदु जर थोड्या मुसलमानाना भीत असतील तर त्याच्यावर नेहमींच कोणीतरी दडपण आणत राहणार. आणी ८।९ कोटी मुसलमानाना त्याच्या इच्छेविरुद्ध किती दिवस आपण आपल्याबरोबर ठेवणार ? अर्थात् सर्व मुसलमानाना पाकिस्तान पाहिजे आहे किंवा काय हा प्रश्न आहेच ! पण तशी शंका वाटत असेल, तर मतें घ्यावीं. अर्थात् पाकिस्तानचा प्रश्न इतका सोपा नसेलहि. पण सध्या तरी असें वाटतें आहे खरें ! कोणी म्हणतात पाकिस्तान दिलें तर खैबर खिंड वगैरे भाग हिंदूंच्या ताब्यातून जाईल आणि ज्याला नैसर्गिक सीमा ( Natural Frontiers ) म्हणतात, त्या आपल्या म्हणजे हिंदूंच्या हातीं राहणार नाहींत आणि आपल्यावर हल्ला करणें शत्रूंना सोपें होईल.

* * *

आजपासून स्वतःचें सगळें काम स्वतःच करावयास सुरुवात केली आहे. भाडीं घासणें, कपडे धुणें, खोली झाडणें, सगळें स्वतःच करावयाचें असें ठरविलें आहे. मागेंहि मी बहुतेक सगळें काम करीत होतोंच पण मध्यंतरीं कांहीं दिवस सोडून दिलें होतें. आता मगनशेटाच्या उदाहरणावरून पुन्हा सगळें स्वतःच करावयाचें ठरविलें आहे. पूर्वीं शिकत असताना माझें धोतर वगैरे कपडे मी स्वतःच धूत असे. पण आता अलीकडे तें सारें बंद होतें, बाकी आपलें काम आपण स्वतःच करण्यात ' स्वच्छ ' तर वाटतेंच पण मनाला एक प्रकारचा आनंदहि वाटतो. आळस जरा सोडला पाहिजे एवढेंच.

●

## २–३–४३

काल रात्रीं आणि आज पहाटें श्री. **उमाशंकर दीक्षित** यांच्या साहाय्यानें आकाशातील ताऱ्यांचें आणि तारकापुंजाचें निरीक्षण केलें. सध्या रात्र ( पहिली ) काळोखी आणि स्वच्छ असते आणि पहाटेंहि चंद्राचा प्रकाश मंदच असतो. त्यामुळें तारे चांगले पहावयास सापडतात. जळगावचे श्री. **रघुनाथराव वाडेकर** हेहि आमच्याबरोबर होते. त्यानाहि खगोलशास्त्राचा नाद आहे. आम्हाला नक्षत्रें माहीत होतीं पण निरनिराळ्या राशी आणि इतर तारामंडळें याची चांगलीशी माहिती नव्हती. ती दीक्षितानीं करून दिली. राशींचीं जीं नावें आहेत त्याच्यावरून आकाराची कल्पना करावी तर कांहीं ठिकाणीं ती ओढून ताणून करावी लागते - पूर्वींच्या लोकांनीं सतत निरीक्षणानें आपल्या कल्पना निश्चित केल्या होत्या. आपल्याकडील व पाश्चिमात्य नावें एकाच अर्थाचीं आहेत. त्यावरून राशीसंबंधीं नामकरण एकीकडून दुसरीकडे गेलें असलें पाहिजे हें उघड आहे. महाभारतात राशींचा उल्लेख नाहीं. राशी ग्रीकांनीं हिंदुस्थानात आणल्या असें कोठे तरी वाचल्याचें मला स्मरतें; बहुधा **चिंतामणराव वैद्यांच्या** ' महाभारताच्या उपसंहारा'त असावें.

इंग्रजीमध्यें या शास्त्रावर पुष्कळ पुस्तकें आहेत. त्यांपैकीं आम्ही कांहीं

मिळविलीं आहेत व कांहीं मागविली आहेत मराठीमध्यें मात्र फारशीं पुस्तकें नसावीत असे वाटते. श्री. **शं. बा. दीक्षित** यांचें एक पुस्तक आहे तेवढेंच. त्यातील भाषा व माहिती चांगली असली तरी हल्लीं खगोलासंबंधी जे ज्ञान हस्तगत करण्यात आलें आहे त्या मानानें त्या पुस्तकात फारच कमी माहिती आहे. आणि साहजिकच आहे. कारण तें पुस्तक जुनें आहे. गुजरातींतहि एखाद्या दुसऱ्या लहान पुस्तकाखेरीज पुस्तकें नाहींत असें दिसतें हिंदीमध्ये '**सौरपरिवार**' नावाचा एक मोठा ग्रंथ डॉ. **गोरख प्रसाद** यानीं लिहिला आहे. तो फारच चांगला आहे या १२ रु. किंमतीच्या ग्रंथात फक्त सूर्य आणि त्याचा परिवार म्हणजे चंद्र, ग्रह, उपग्रह, धूमकेतु वगैरेंचीच माहिती असली तरी ती इतकी भरपूर, मनोरंजक, उद्बोधक आणि चटकदार आहे कीं, अशाच प्रकारचें अत्यंत उपयुक्त पुस्तक मराठींत नाहीं याचे वाईट वाटतें. या पुस्तकात पहिलीं दीडशें पानें खगोलशास्त्राचा इतिहास, दुर्बिणीची रचना इत्यादि प्राथमिक माहितीनेंच भरलीं आहेत, तीं चांगलीं आहेत. अनेक संशोधक, त्याचे संशोधनविषयक प्रयोग इत्यादि हकीकतहि फार मनोरंजकपणें लिहिण्यात आली आहे. पण या पुस्तकाचें मुख्य वैशिष्ट्य हे कीं, त्यात भरपूर चित्रें, फोटो आणि आकृति हीं देण्यात आलीं आहेत आणि तीं सर्व उत्कृष्ट आहेत. वैद्यकीय पुस्तकाप्रमाणेंच खगोलशास्त्रासारख्या विषयावरील पुस्तकातहि जितकीं चित्रें आणि आकृती असतील तितका तो विषय सुगम आणि मनोरंजक होतो व त्या पुस्तकाची उपयुक्तता वाढते. डॉ. गोरख प्रसाद याचें वरील पुस्तक सर्वच दृष्टींनीं चांगलें आहे, तें सर्वांनीं वाचावें ज्याना मोठें पुस्तक घेणें शक्य नसेल अशाकरिता व विद्यार्थ्यांकरिता डॉ. गोरखप्रसाद यानीं दुसरें एक छोटें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्याची किंमत १२ आणे आहे. या पुस्तकात मोठ्या पुस्तकातील सर्व महत्त्वाचीं चित्रें व फोटो दिले असून, सुबोध भाषेंत कांहीं माहितीहि दिली आहे. शाळातून क्रमिक पुस्तक म्हणून अशीं पुस्तकें लावावीं. विद्यार्थ्यांचें लक्ष या विषयाकडे आकृष्ट होईल अशीच त्याची रचना आहे. मी, भाऊसाहेब वाडेकर व दीक्षित असे आम्ही तिघे हें पुस्तक वाचीत आहों. मी वाचतो व ते तिघे ऐकतात. फार छान पुस्तक आहे.

मराठींत या विषयावर पुस्तकें का नाहींत असें मला सारखे वाटतें. म्हणजे वाचकवर्गाला या विषयाची आवड नाहीं असे समजावयाचें, का या विषयाचा खोल अभ्यास करणारा लेखक नाहीं ? काहींहि कारण असो, मराठींत अद्यावत् असे या विषयावर पुस्तक नाहीं हे खरें मला स्वतःला पुष्कळ वेळा आपणच एक पुस्तक या विषयावर लिहावे असें फार वाटतें. पण हा अभ्यासाचा आणि वेळ मिळण्याचा प्रश्न आहे. सध्या मी विद्यार्थी-जीवनावर एक पुस्तक लिहीत आहे त्यामुळें तूर्त सवड मिळणें शक्य नाहीं. पाहूं पुढें केव्हा जमेल तें !

वरील हिंदी पुस्तकात सौरपरिवाराचीच विशेष माहिती आहे. सर्व आकाशाची माहिती देणारें व शास्त्रीय चर्चा करणारें एक पुस्तक लिहा असा मी दीक्षिताना आग्रह करीत आहे त्यांच्याहि मनात आहे. पण लिहितील तेव्हा खरें !

नक्षत्रराशींखेरीज आकाशातील इतर तारकापुंजाचीं गुजराती अगर मराठी नावे हीं इंग्रजीचीं भाषान्तरें आहेत या नावापाठीमागे काहीं पौराणिक कथानकें आहेत. देवयानी, शर्मिष्ठा, ययाति अशीं आमच्या पौराणिक कथातील नावेंहि योजण्यात आलीं आहेत एकंदरींत विषय फारच मनोरंजक आहे.

*　　*　　*

**आगरकरांच्या** निबंधात खालील वाक्ये मला फार फार मार्मिक वाटतात. 'प्रश्न करणाराचें अंतःकरण व ओंठ याच्यात विसंगतता असेल तर त्याने कितीहि आक्रोश केला तरी व्यर्थ होय. परन्तु या दोहोंमध्ये संगति असेल तर विशेष आक्रोश करण्याचीहि जरूर पडत नाहीं. अन्तःकरण व ओंठ याच्यात तारायंत्र सुरु असेल तर हळूं उच्चारलेल्या शब्दासहि विलक्षण जोर येतो व त्यामुळें सर्वांस मान डोलवावी लागते.'

'राजकारणाचें व्यापक क्षेत्र सोडून आपल्या भोवतालच्या साध्या व्यवहारात पाहिलें तरी आपणांस हाच अनुभव येतो. अशा, अंतःकरण आणि ओंठ याच्यात तारायंत्र सुरूं असणाऱ्या थोर व्यक्ती आमच्याबरोबर अनेक आहेत. त्यांच्याबद्दल आदर वाटतो. या व्यक्ती आपापल्या व्यवहारा-

तच गुंग झालेल्या असतात. पण पानाखालीं लपून बसलेल्या सुगंधी पुष्पा-कडे फुलपाखरें धावून जातात त्याप्रमाणे, या शांत, निगर्वी, साध्या व्यक्ती-कडे लोक आकृष्ट होतात. तुरुंगात सर्वांचा निकट सहवास झाल्यावर इतर लोकाविषयीं आपलीं मतें किती बदलतात! ज्याची आपणाला फारशी माहिती नसते आणि ज्याचीं नावें वर्तमानपत्रात झळकत नाहींत, त्यापैकीं कित्येकाची वास्तविक योग्यता इतकी मोठी असते कीं, इतके दिवस आपणास याची ओळख कशी पटली नाहीं याचें आश्चर्य वाटतें. त्यांची संस्कृति, त्याचे विचार, उच्चार आणि आचार हीं सर्व उच्च प्रतीचीं असतात. अशा व्यक्तींचा निकट सहवास लाभणें हा तुरुंगात येण्याचा एक अलभ्य लाभच नाहीं का?

●

## ३-३-४३

आजचा आमचा दिवस विशेष आनंदात गेला. कारण आज गांधींचा उपवास सकाळीं सुटणार होता. ते या उपवासांतून सुखरूप बाहेर पडले असल्यानें सर्वांना आनंद वाटणें साहजिकच आहे हिंदुस्थानात, बाहेर सर्व देशभर लोकानीं आपला आनंद कसा व्यक्त केला असेल हें आम्हाला काहीं कळणार नाहीं, पण आम्ही मात्र येथें काहीं कार्यक्रम केला. सकाळीं प्रभातफेरी आमच्या चारी यार्डांतून काढली. वास्तविक प्रभातफेरीचा हेतु लोकाना जागृत करणें हा आहे. तथापि प्रभातफेरींत भाग घेणारानाहि एक प्रकारचा आनंद आणि उल्हास वाटत असतो. या दुसऱ्या हेतूनेंच आम्ही प्रभातफेरी काढली होती. कारण येथें फेरी काढ-णारे आम्हींच, आणि ती काढणार ती आमच्याच खोल्यावरून! पण आज पुष्कळ दिवसानीं प्रभातफेरीचा आनंद पुन्हा मिळाल्यानें बरें वाटलें, त्यानंतर ईश्वराचे आभार मानण्याकरिता प्रार्थना झाली. कुरेशी यांनीं नित्याप्रमाणें कुराणातील प्रार्थना म्हटली. श्री. सरदार प्रतापसिंह यांनीं आपल्या शीख प्रार्थना म्हटल्या. त्यानंतर आमची सर्वांची म्हणजे हिंदूंची

प्रार्थना झाली. दुपारीं प्रत्येक यार्डात महात्माजींचा फोटो ठेवून कांहीं आरास केली होती व प्रसादहि वाटण्यात आला. आमच्या यार्डात म्हणजे यार्ड नं. १ मध्यें व दुसऱ्या यार्डात चागली सजावट केली होती. आमच्या यार्डात तर थोड्याच अवधींत सर्व व्यवस्था करूनहि ती चागली झाली होती. पण तिसऱ्या यार्डात गुजराथी लोकांनीं जी मौज केली होती ती फारच विलक्षण. त्यांनीं सगळीकडे तोरणें वगैरे बाधलीं होतींच पण फरशी-वर हिंदुस्थानचा एक नकाशा काढून पुणें शहर नकाशात जेथें आहे तेथें पणती पेटवून ठेवली होती. त्यानंतर किनाऱ्याकिनाऱ्याने ७५ दिवे ( पणत्या ) ठेवण्यात आले होते. महात्माजींना सध्या ७५ वे वर्ष अस-ल्यानें या ७५ पणत्या ठेवण्यात आल्या होत्या. त्याच्या खालीं पायरीजवळ २१ पणत्या २१ दिवसाच्या उपवासाचें प्रतीक म्हणून ठेवण्यात आल्या होत्या. त्या सर्व पणत्याचा प्रकाश अत्यंत आल्हाददायक वाटत होता. का कुणाला ठाऊक विजेच्या दिव्यापेक्षा तेलाचे दिवे आणि विशेषत. पणत्या या मला नेहमीं जास्त सुंदर वाटतात. पुष्कळाना असेंच वाटत असावें असें मला वाटते. दिवाळीच्या आराशींतसुद्धा विजेच्या दिव्याची ओळ लावण्या-पेक्षा पणत्याची राग लाविल्यास ती जास्त शोभायमान दिसते. आज इथें विजेचे दिवेहि होतेच. पण त्याचा मंद प्रकाश कांहीं विशेषच खुलून दिसत होता. त्याची साथ करायला आणि आमचा आनंद पाहायला आकाशातहि कुणीतरी असंख्य पणत्या लाविल्या होत्या.

पण या यार्डातील खरी शोभा निर्माण झाली होती ती निराळ्याच एका गोष्टीमुळें ! फरशीच्या पाठीमागें एक काळसर हिरवे कापड लावलें होतें आणि त्यावर अगदीं वर एक वर्तुळ काढून त्या वर्तुळात महात्मा गांधींचा मुखवटा अगदीं थोड्याच रेषानीं पण अगदीं बरोबर काढला होता. त्याखालीं ‘ शतं जीव शरदः ’ अशीं अक्षरें मोठ्या अक्षरात लिहिण्यात आलीं होतीं. त्याच्या खालीं चरखा आणि त्याच्या खालीं दपीज्योति—तेवत असलेली पणती—दाखविण्यात आली होती. सर्वांत खालीं एक सुंदर प्रफुल्ल कमल-हिंदी संस्कृतीचें प्रतीक—दाखविण्यात आलें होतें, या सर्व आकृतींचा रंग पांढरा होता आणि त्या आकृती काढणाराचें कौशल्य, फारच उच्च दर्जाचें

आहे हें सहज समजण्यासारखें होतें. अगदीं कमींत कमी रेषांचा उपयोग करून अत्यंत सुंदर आकृती तयार करण्यात आल्या होत्या. पण सर्वांत आश्चर्य म्हणजे त्या कोणत्याहि रंगानें चित्रित केल्या नसून त्या निर्माण करण्यासाठीं कापसाचा उपयोग करण्यात आला होता. कापसाचे बारीक सुरेख पेळू करून त्याचा सरळ, वक्र वर्तुळ वगैरे रेषांसाठीं उपयोग केला होता. पण ही गोष्ट जवळ गेल्यावरच कळून येण्यासारखी होती. हें सारें कौशल्य आनंदाचे श्री. **नटवरलाल दवे** यांचें होते. श्री. नटवरलाल हे ग्रॅज्युएट असून घरचे सुखी आहेत असें कळतें. पण ते अत्यंत गुणी आहेत. दिसायला साधे आणि नम्र पण नेहमीं कांहीना कांहीं व्यवसायात गुंतलेले असतात. ते खूप वाचतात आणि त्याना अनेक भाषा येतात. 'बंगाली' त्यांना उत्तम येते आणि त्यांच्याजवळ पुष्कळ बंगाली पुस्तकें आहेत. इंग्रजींतहि ते खूप वाचतात आणि मराठी त्याना चांगलें येतें. येथें आल्यावर त्यांनीं **आपटे गुरुजींच्या 'टिळक चरित्रा'** चें गुजराथींत भाषांतर केलें. ते कॉंग्रेसचे एक निष्ठावंत कार्यकर्ते असून सूत कातण्यात त्यांचा वेग मागें टाकणारे क्वचित्‌च कोणी आढळून येतील.

गाण्याचा कार्यक्रम अर्थात् चांगला झाला. **दामुअण्णा धत्ते, अंबादास, श्रीकान्त, नारायणराव सुर्वे, डॉ. जोशी, बटुक देसाई** इत्यादींचें पद्यगायन झालें. श्री. **मोहन देशमुख** यांनीं **साने गुरुजींची** एक उत्कृष्ट कविता म्हणून दाखविली. अहमदाबादचे प्रो. **गोळे** यांनीं सुंदर भजन म्हटलें. तुकारामाचे अभंग मुळातच अगोदर गोड आहेत आणि ते कोणी शांतपणें सुरेल आवाजात म्हटले म्हणजे फारच गोड वाटतात. (सरबत, पेढे यांचा प्रसादहि सर्वांना वाटण्यात आला) सर्वांच्या चेहेऱ्यावर एका संकटातून बाहेर पडल्याची स्पष्ट भावना होती. माझ्याजवळ श्रोते म्हणून बसलेले सिन्नरचे **काळे** म्हणाले. का हो! **गांधी** जर उपवासात वारले असते तर आपल्यापुढें केवढा अंधार पसरला असता!' मी म्हटलें, 'खरें आहे! आणि मग पुन्हा कधीं आजच्या इतका आनंद उपभोगण्याची पाळी आली असती किंवा नाहीं कुणाला ठाऊक!'

## ४--३-४३

सध्या मी **इब्न बतूत** ( Ebn Battuta ) या १४ व्या शतकातील आफ्रिकन मुसलमान प्रवाशाचे प्रवासवर्णन वाचीत आहे. Broadway Travellers या मालेंतून **सर ई. डेनिसन रॉस** व **एलीन पॉवर** यानीं त्याचें संपादन केलें असून **जॉर्ज रटलेज अँड सन्स** यानीं ते प्रसिद्ध केलें आहे. प्रवासवृत्ताचें भाषांतर आणि या पुस्तकाकरिता त्यातील मजकुराची निवड ही **गिब साहेबांनीं** केली आहे. Broadway Travellas ही एक उत्कृष्ट माला रॉस व पॉवर या संपादकद्वयानीं संपादिली असून त्या मालेतून प्रवासवृत्तविषयक अनेक उत्कृष्ट ग्रंथ बाहेर पडल्याचें या पुस्तकाच्या शेवटीं प्रकाशित पुस्तकाची जी यादी दिली आहे तिच्या-वरून दिसून येतें. अगदीं प्राचीन काळापासून जगातील सर्व देशातून जे प्रवासी यात्रेच्या अगर नवीन शोधाच्या निमित्ताने बाहेर पडले त्या सर्वांच्या प्रवासवृत्ताचा या मालेत समावेश करण्याचें काम चालू आहे. त्या प्रवाशानीं लिहिलेलीं अगर लिहिवलेलीं प्रवासवृत्ते इंग्रजींत भाषान्तरित करून त्याच्या स्पष्टीकरणार्थ विस्तृत टीपा देण्यात आल्या आहेत. अप्रसिद्ध—प्रसिद्ध अशा दोन्ही प्रकारच्या वृत्ताची निवड करण्यात आली आहे. स्वतः संपादकद्वय उत्कृष्ट प्रवासी आणि विद्वान् व्यक्ती आहेत. सर डेनिसन् रॉस हे, Director of the School of Oriental Studies आणि Professor of Persian in the University of London (लंडन युनिव्हर्सिटींत पर्शियनचे प्रोफेसर व पौर्वात्य अभ्यासाच्या शाळेचे डायरेक्टर ) असून त्यानी युरोप, इराण, तुर्कस्तान, हिंदुस्थान, मध्य आशिया वगैरे प्रदेशातून प्रवास केला आहे. डॉ. **एलीन पॉवर** ( Dr. Eileen Power ) या Reader in Medieval economic history in the university of London ( **लंडन युनिव्हर्सिटीमधील मध्ययुगीन अर्थशास्त्राचे प्रोफेसर** ) असून **आल्बर्ट काहन** ( Albert Kahn ) शिष्य-वृत्ति मिळविणाऱ्या पहिल्याच महिला आहेत. ही शिष्यवृत्ति प्रवासाकरिता दिलेली असते आणि तिच्या जोडीला पृथ्वीभोंवती प्रवास करण्यास एक

वर्षाची व्यवस्था केलेली असते प्रत्येक पुस्तकाला एक नज्ञाची प्रस्तावना असून पुस्तकाच्या शेवटीं स्पष्टीकरणार्थ टीपा दिल्या आहेत. या पुस्तकात ज्या टीपा दिल्या आहेत त्यावरून या प्रवासवृत्ताचा अभ्यास किती सूक्ष्मपणानें आणि चिकित्सक बुद्धीनें करण्यात आला आहे ते दिसून येतें. प्रवास वृत्तात ज्याज्या स्थलकालाचा उल्लेख आला आहे त्याचें स्थान व काल हीं इतर प्रवासवृत्ताशीं आणि इतिहासाशीं व भूगोलवर्णनाशीं ताडून पाहण्यात आलीं आहेत. सध्या प्रसिद्ध नसलेल्या पण पूर्वी एकेकाळीं भरभराटलेल्या अगर प्रवासवृत्तात विशेष संबंध आलेल्या स्थलाचे अक्षांश रेखांशहि देण्यात आलेले आहेत. ज्या ज्या प्रदेशातून इब्न बतूतने प्रवास केला त्या त्या देशाच्या इतिहासाचें अध्ययन करून संपादकानीं त्याचा योग्य उपयोग टीपा देण्यामध्यें केलेला दिसून येतो. निरनिराळ्या धर्मातील रीतीरिवाजाची माहिती, धर्मतत्त्वाचें अध्ययन, त्या त्या देशातील लोकाच्या कल्पना या सर्वांचा प्रत्यय टीपा वाचताना येतो पुस्तकात प्रवासमार्ग दाखविणारे काहीं नकाशेहि घालण्यात आले आहेत आणि अशा प्रवासवर्णनात्मक पुस्तकात त्याची अत्यंत जरूरी आहे याशिवायहि आणखी अनेक विशेष या संपादनाबाबत दिसून येण्यासारखे आहेत

या पुस्तकाच्या यादींत हिंदुस्थानविषयक दोन पुस्तकें आहेत. एक up the country ( देशावर ) नावाचे पुस्तक उत्तर हिंदुस्थानात राहणाऱ्या **Hon. Emily Eden** नावाच्या बाईनें आपल्या इंग्लंडमधील वहिणीला तेथील प्रांतातील ( उत्तर हिंदुस्थान ) वर्णनविषयक पत्रें लिहिलीं होतीं त्याचें आहे. एडनबाई लॉर्ड ऑकलंड या हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलची बहीण होती आणि १८४७ सालीं ती त्याच्याबरोबर आली होती. दुसरें पुस्तक The first Englishman in India ( हिंदुस्थानातील पहिला इंग्रज ) या नावाचें असून एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत हिंदुस्थानात आलेल्या लोकाचीं पत्रें आणि त्यानीं वर्णिलेल्या कथा याचा त्यांत संग्रह केला आहे. खुद्द हिंदी प्रवाशानें लिहिलेलें असें एकहि प्रवासवृत्त या मालेंत दिसत नाहीं. अर्थात् मालेंत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें अजून थोडीच आहेत. अनेक जगप्रसिद्ध प्रवाशांचीं प्रवासवृत्तें अजून प्रसिद्ध व्हावयाचींच आहेत असें

दिसतें. इब्न बत्तूतचें वृत्त म्हणजे मी सध्या वाचीत असलेलें पुस्तक १९२९ सालीं प्रसिद्ध झालेलें आहे. त्यानंतर आणखी कांहीं प्रवासवृत्तें प्रसिद्ध झालींहि असतील. पण त्यात कोणा हिंदी–प्राचीन अगर अर्वाचीन–प्रवाशानीं लिहिलेलीं प्रवासवृत्तें प्रसिद्ध झालीं असतील अगर पुढें मागें तीं प्रसिद्ध होतील अशी आशा करण्यास जागा आहे असें वाटत नाहीं. हिंदी लोकां-विषयीं इंग्रज संपादकाना अनादर आहे आणि त्याच्या वृत्ताताला संपादक महत्त्व देत नाहींत हे त्याचे कारण नव्हे, उलट प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाच्या यादीवरून व या पुस्तकाचें जें संपादन केले आहे त्याच्या स्वरूपावरून हिंदी प्रवाशाचीं प्रवासवृत्ते संपादकाना मिळाली तर आनंदानें त्याचें संपादन करून तीं प्रसिद्ध केलीं जातील असें वाटतें. पण मला वाटतें दुर्दैवानें तशीं प्रवास-वृत्तें आपल्या हिंदी लोकानीं लिहिलेलींच नाहींत. निदान कांहीं असलीं तरी तीं अजून उजेडात आली नसावीं. हिंदुस्थानातील प्राचीन वाङ्मयाइतकें उज्वल वाङ्मय जगातील कोणत्याहि देशाच्या इतिहासात सापडण्यासारखें नाहीं. तत्त्वज्ञान, काव्य, राजनीति, वैद्यक, अर्थशास्त्र, नाटक, व्याकरण, न्याय, वेदान्त कथा, इत्यादि ज्ञानाच्या अनेक प्रमुख शाखातील वाङ्मयात प्राचीन हिंदुस्थानची बरोबरी इतर कोणत्याहि देशातील वाङ्मय करूं शकणार नाहीं ही गोष्ट सर्वमान्य आहे. एवढेंच नव्हे तर आजहि त्या वाङ्मयाची आधु-निक विज्ञानप्रणीत वाङ्मयाशी तुलना केली तरी कित्येक बाबतींत तें अधिक सरस ठरण्यासारखें आहे. संस्कृत आणि प्राकृत या भाषात आढळणारें वाङ्मय विपुल, मनोहर, प्रसन्न आणि हृद्य आहे याबद्दल जगातील सर्व पंडिताची एकवाक्यता आहे. पण मला वाटतें चरित्रें, इतिहास आणि प्रवासवृत्तें या वाङमय प्रकाराच्या बाबतींत मात्र आपण दरिद्री आहों. त्या त्या काळीं अगर नंतर होऊन गेलेल्या कित्येक कवींच्या अगर ग्रंथ-काराच्या वाङ्मयात कांहीं कांहीं उल्लेख आढळतात हें खरें पण ते तात्पुरते आणि त्रोटकच. **दशकुमार चरित, हर्षचरित** यासारखे चरित्रग्रंथ हे सरळ, साध्या चरित्रवर्णनापेक्षा त्या त्या नृपतींच्या स्तुतिवर्णनालाच अधिक वाहिले असल्यानें चरित्रवाङ्मय या दृष्टीनें त्याचें महत्त्व फारसें नाहीं. **कल्हणाची राजतरंगिणी** ही त्यातल्या त्यात बरीच विश्वसनीय

आणि खराखुरा इतिहास लिहिण्याच्या दृष्टीने लिहिलेली दिसते पण एकं-दरींत वरील तिन्हीं क्षेत्राशी संबंध असलेल्या वाङ्मयाची उणीव भासते. वास्तविक हिंदुस्थानात इतिहास फार मोठ्या प्रमाणावर घडला आहे. हिंदुस्थान हा संस्कृतीनें अत्यंत प्राचीन देश. हिंदुस्थानात मोठमोठीं राज्यें, साम्राज्यें आणि त्याचे **अशोक, चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, मिलिंद, हर्ष, पुलकेशी** यासारखे प्राचीन आणि **शिवाजी, अकबर, औरंगजेब, प्रताप, पृथ्वीराज** असे आधुनिक राजे आणि सम्राट् होऊन गेले राजकारणी मुत्सद्याचीहि वाण कधीं हिंदुस्थानला पडली नाहीं. प्राचीन काळापासून आर्य, ग्रीक, सिथियन, हूण, शक, तार्तार मोंगल वगैरे लोकांच्या स्वाऱ्या सारख्या चालू असल्यानें अनेक साम्राज्याची उलथापालथ हिंदुस्थानात झाली. पण या सर्व हकीकतींचें संगतवार टिपण कोणी करून ठेवलेलें दिसत नाहीं. प्राचीन काळचे इतर वाङमय, शिलालेख आणि ताम्रपट, पत्रव्यवहार दानपत्रें, सरकारी दप्तरे इत्यादि सामग्रीवर आणि परदेशीय प्रवाशानीं येथें येऊन लिहून ठेवलेल्या वृत्तान्तावरून इतिहास रचावा लागत आहे. काहीं बखरी वगैरे वाङ्मय आहे आणि तें इतिहास या सदराखालीं येईलहि पण तेहि फारसे विश्वसनीय समजण्यात येत नाहीं. वैद्यकात ज्याप्रमाणें क्ष किरणाचा उपयोग अनेक रोगात स्वतंत्रपणें निर्णायक समजत नाहींत पण त्याचा इतर मार्गानीं केलेल्या निदानाचें निर्णायकत्व ठरविण्यात फक्त उपयोग करतात त्याप्रमाणेंच या बखरींचा उपयोग आहे.

पण त्यापेक्षाहि प्रवासवृत्ताचें आपल्याकडे दुर्भिक्ष आहे. अलीकडे प्रवासवर्णनें यथातथ्य व तपशीलवार लिहिण्याची प्रथा पडली आहे ही आनंदाची गोष्ट आहे. पण पूर्वी काहीं कोणी प्रवासवर्णनें लिहून ठेवलेलीं मला तरी माहीत नाहींत ( तशीं असल्यास कोणी माझ्या निदर्शनास आणून दिल्यास फार बरें होईल. ) वास्तविक प्राचीन काळापासून हिंदुस्थानचा व्यापार जगातील फार दूरदूरच्या प्रदेशातून चालत असे. हिंदी व्यापारी जलमार्गें अगर जमिनीवरून अनेक खंडात हिंडत असत. स्पेनपर्यंत पश्चिमेकडे आणि जपान, चीन, मलाया, जावा–सुमात्रा, आस्ट्रेलियापर्यंत पूर्वेकडे तर त्यांचा

संचार असेच. Hindu America ( हिंदु अमेरिका ) या ग्रंथात श्री. **चमणलाल** यानीं दाखविल्याप्रमाणें खुद्द अमेरिका खंडातहि भारतीय आर्यांचा प्रत्यक्ष संबंध होता असें दिसतें. शेंकडों, हजारों वर्षें हा विश्वसंचार चालू होता. सर्व कला आणि इतर सर्व प्रकारचें वाङ्मय यात उच्चाक गाठणाऱ्या भारतीयानीं आपल्या प्रवासाचें वृत्तान्त तेवढे कसे लिहून ठेवले नाहींत याचें आश्चर्य वाटतें कालाच्या उदरात हे वृत्तान्त गडप झाले असावे असें म्हटलें तर इतर विषयावरील वाङ्मय आजहि इतक्या मोठ्या प्रमाणात उपलब्ध असतां अचूक प्रवासवृत्तान्तानीं तेवढें गडप व्हावें हें अनुमान पटण्यासारखें नाहीं. पुष्कळसें वाङ्मय कालाच्या सर्वभक्षक उदरात विलीन झाले. पण त्यातूनहि बचावून राहिलेले वाङ्मय काय थोडें आहे? आणि हाच नियम लावावयाचा तर इतर देशातील प्रवासवृत्ताताविषयींहि असेंच व्हावयास पाहिजे होतें. पण मला वाटतें भारतीयाना प्रवास वृत्तान्त लिहून ठेवण्याची संवय नसावी. व्यापाराच्या निमित्तानें परदेशीं गेलेल्या लोकाचें तर राहोच पण धर्मप्रसारासाठीं देशोदेशीं ज्यानीं प्रवास केला त्यानीं तरी आपल्या प्रवासाच्या हकीकती लिहून ठेवावयास पाहिजे होत्या. पारमार्थिक चिंतनात गुंतल्यामुळें ऐहिक गोष्टींची त्यास पर्वा नव्हती असें म्हणावें तर प्राचीन अगर मध्ययुगीन हिंदुस्थानचा इतिहास ह्याच्या उलट साक्ष देतो. चित्रकला, शिल्प, काव्य, संगीत, ललित वाङ्मय या सर्व ऐहिक कलाचा उत्कर्ष केवळ पारमार्थिक हेतूनें नव्हे तर सुखोपभोगाच्या हेतूनेंहि केला गेला. **हुएनत्स्यांग, फाएन** सारख्या चिनी प्रवाशानीं, **मेग्यास्थिनीस, बर्निअर, जॅकमाँट** सारख्या युरोपीय प्रवाशानीं आणि कित्येक अरब आणि मुसलमान प्रवाशानीं हिंदुस्थानात येऊन येथील हकीकती लिहिल्या आहेत. अर्थात् प्रवासवृत्तान्त लिहिणारापैकीं सर्वांनींच आपण होऊन प्रवासाच्या हकीकती लिहिल्या असें नाहीं. काहींनीं राजाज्ञेवरून तर **मार्को पोलो** सारख्या धुरंधर जगप्रवाशानें तुरुंगात आपला वेळ जाण्यासाठीं आपल्या मित्रांना त्या सांगितल्या आणि त्या श्रोत्यानीं त्याचें टिपण केलें. इब्न बतूतलाहि राजाज्ञेवरून आपला वृत्तान्त सांगावा लागला व तो **महंमद इब्न जुझाय** या मंत्र्यानें टिपून ठेवला असें मानावयास

जागा आहे. प्रसिद्ध जगप्रवासी **मॅगेलिन** ज्याचें वर्णन पृथ्वीप्रदक्षिणा करणारा पहिला वीर म्हणून करण्यात येते, त्याच्याबरोबर **जयश्रीराव** हा हिंदी नाविक पृथ्वीप्रदक्षणेंत सामील होता, एवढेंच नव्हे तर **मॅगेलिन** मध्येंच क्यूबाबेटावर मारला गेला तेव्हा प्रदक्षिणा पुरी करण्याचें पुढील कार्य या जयश्रीरावानेंच पार पाडलें असें '**रत्नाकर**' मासिकाच्या एका अंकात वाचलेलें मला स्मरतें. असे कितीतरी धाडशी वीर प्रवासी हिंदुस्थानातून बाहेरदेशीं प्रवासासाठीं गेले असतील. पण खुद्द हिंदुस्थानहि कांहीं लहान देश नाहीं. तें एक उपखंडच आहे. अलीकडे प्रवास त्वरित आणि सोपा झाला आहे. पण पूर्वी हिंदुस्थानात प्रवास करावयाचा म्हणजे महिनेचे महिने लागत असत आणि प्रवाशाना अनेक संकटातून पार पडावें लागत असे. हल्लींप्रमाणे घाईनें प्रवास न झाल्यानें त्यांचा ठिकठिकाणच्या लोकाशीं चागला दृढ परिचय होत असे आणि निरनिराळे प्रदेश, शहरें आणि प्रात पाहण्याची चागली संधीहि मिळत असे. असें असूनहि प्रवासाचें वर्णन कोणी लिहून ठेविलें नसावें? इतर देशातील प्रवाशापैकीं पुष्कळसे जसे यात्रेकरू असत तसे हिंदुस्थानांतील दूर पसरलेलीं क्षेत्रें पाहण्यासाठीं हिंडणाऱ्या यात्रेकरूंची संख्याहि कांहीं लहान नसावी. एकंदरींत भारतीय प्रवाशानीं लिहिलेलीं वृत्तें उपलब्ध नाहींत एवढें खरें!

मला स्वतः प्रवासवर्णनें वाचण्याची फार हौस आहे. तीं वर्णनें वाचल्यावर प्रवास केल्यासारखें थोडेंसें तरी वाटतें हें त्या हौशीचें कदाचित् कारण असेल.

●

## ५-३-४३

गांधींचा उपवास संपला, आतां पुढें काय? असा प्रश्न हिंदी लोकापुढें पुन्हा उभा आहे. अर्थात् येथें आमच्यातहि त्याच प्रश्नाची जोरानें चर्चा चालू असल्यास त्यांत नवल काय? गांधी कांहींतरी मार्ग शोधून काढतील असें पुष्कळांस वाटतें. राजगोपालाचार्य हे दुर्दम्य आशावादी आहेत. तेहि

सप्रू वगैरेंच्या साहाय्यानें आपला प्रयत्न सतत चालू ठेवतील याविषयीं शंका वाटत नाहीं. अणे, सप्रू, राजगोपालाचार्य वगैरे पुढारी मुंबईला एकत्र जमलेच होते. परदेशांतहि गांधींच्या उपवासानें हिंदी राजकीय प्रश्नाकडे तेथील लोकांचें लक्ष वेधलें आहे. गांधींच्या उपवासात त्यांनीं Sweet lime juice म्हणजे मुसुंबीचा रस कांहीं वेळा घेतला, त्याबद्दल चर्चा वृत्तपत्रात थोडीबहुत चालू आहे. त्याबाबत डॉ. बी. सी. रॉय यानीं दिलेली मुलाखत चांगली आहे. त्यांनीं सांगितलें कीं, एक तर गांधींनीं, आपली या उपवासात मरण्याची बिलकूल इच्छा नसल्यानें आपण पाणी व Citrus fruit juice ( निंबाचा रस ) घेणार असें अगोदरच जाहीर केलें होतें. आणि त्यांनीं तें घेतलें. तेंहि घेतल्यावाचून प्राण राहणार नाहींत अशा वेळीं डॉक्टरांच्या आग्रहावरून ! शिवाय त्या रसाचें प्रमाण इतक्या किमान मर्यादेपर्यंत ठेवण्यात आलें होतें कीं, त्यामुळें उपवास मोडला असें बिलकूल मानण्याचें कारण नाहीं। गांधींची जबर इच्छाशक्ति आणि त्यांनीं स्वतःच्या इंद्रियांवर मिळविलेला ताबा यामुळेच ते उपवासातून सुखरूप बाहेर पडले. त्यांच्या रक्तांत व लघवींत जीं द्रव्य सापडलीं त्यावरून uremia हा विषारी दोष त्यांच्यांत कायम राहिला होता आणि दुसऱ्या एखाद्या माणसाच्या अंगांत तीं विषें उत्पन्न झालीं असतीं तर त्याचें प्राणोत्क्रमण झालें असतें. यात गूढ असें कांहींच नाहीं. हल्लींचें युगच असें आहे कीं, प्रत्येकजण भूक, तहान इत्यादि शरिराच्या व्यापारावर मनाचा बराच ताबा ठेवण्यास शिकला आहे. गांधींनीं सतत संवयीनें आणि प्रयत्नानें हा ताबा जास्त प्रमाणात मिळविला आहे एवढेंच. असा एकंदर त्यांच्या मुलाखतीचा निष्कर्ष होता. शिवाय गांधींचा हा उपवास आपल्यावर झालेल्या अन्यायाबद्दल नापसंति आणि आत्मशुद्धि याकरिता केलेला होता. पाश्चिमात्य कल्पना व पौर्वात्य कल्पना यात फार अन्तर आहे असेंहि ते म्हणाले. गांधींच्याजवळ असलेल्या डॉक्टरांना म्हणे बाहेरून अनेक डॉक्टर, वैद्य, वैदू वगैरे लोकांकडून गांधींना कसे उपचार करावे याबद्दल सूचनांचा मारा चालू होता. मद्रासच्या बाजूकडून तर एकानें गांधींना लावण्यासाठीं विभूति ( राख ) पाठविली होती. या उदाहरणावरून गांधींचे प्राण या

उपवासांत वाचावे याबद्दल प्रत्येकाला कशी कळकळ वाटत होती हें स्पष्ट होतें.

* * *

बॅ. सावरकरांचें 'हिंदुपदपादशाही' हें इंग्रजी पुस्तक डॉ. खाडिलकरांच्या टेबलावर पाहिलें म्हणून सहज कुतूहलानें तें वाचावयास घेतलें. या पुस्तकाची ही दुसरी आवृत्ति आहे आणि हें पुस्तक प्रथम शिरगाव येथें १९२५ सालीं सावरकरानीं लिहिलेलें आहे. 'हिंदुपदपादशाही' सारखा विषय आणि सावरकरासारखे लेखक, त्यामुळे त्यानीं आपली सगळी प्रतिभा या पुस्तकांत ओतली असेल, त्याचें म्हणणें काय आहे हें स्पष्टपणें समजून घेणें जरूर आहे, या भावनेनें मी पुस्तक वाचावयास घेतलें. अर्थात् अजून माझें वाचन चालूच आहे. तेव्हा सबंध पुस्तकाबद्दल आजच काहीं मत बनविणें योग्य नाहीं. पण आज वाचलेल्या पहिल्या ९ प्रकरणावरून मनात थोडे विचार येत आहेत ते आजच टिपून ठेवणें योग्य वाटतें. सावरकरांनीं ब्रह्मेंद्रस्वामींचा उल्लेख मोठया गौरवानें केला आहे. सावरकर म्हणतात. 'He (ब्रह्मेंद्रस्वामी) was undoubtedly moved by great and noble patriotic emotion and principles and never failed to bring, out of confusion of details, the spiritual and moral aspect and hold the ideal of **Swadharma** and **Swarjya** before the eyes of his people The swami had practised severe austerities in his life and developed wonderful yogic powers, as of going into Samadhic trance for a full month every year and living buried underground during that period,' '(ब्रह्मेंद्रस्वामींच्या हृदयात स्वदेशप्रेमाचें तत्त्व व त्याच्या महत्तम व उदात्त भावना यानीं खळबळ उडत असे हें निःसंशय. तपशिलाच्या घोटाळ्यातूनहि आध्यात्मिक व नैतिक बाजू पुढें आणल्याशिवाय व लोकाच्या दृष्टीपुढें स्वधर्म व स्वराज्य याचा आदर्श ठेवल्याशिवाय ते राहिले नाहींत. स्वामीजींनीं जीवनांत कडक तपश्चर्या केली होती. आणि यौगिक सामर्थ्य त्यांनीं एवढें संपादन केलें होतें कीं, प्रत्येक वर्षातून एक

महिना ते स्वतःला जमिनीखालीं पुरून घेऊन समाधी लावीत.) याशिवाय अनेक ठिकाणीं त्याचा आदरपूर्वक उल्लेख करून सावरकरानीं श्रीसमर्थांप्रमाणें ब्रह्मेंद्रस्वामी हे स्वराज्यसंस्थापनेसाठीं महाराष्ट्राला स्फूर्ति देणारे एक दिव्य पुरुष होते असें दाखविलें आहे. वरील उताऱ्यातील महिनाभर जमिनींत गाडून घेण्याच्या कार्यक्रमावर आधुनिक व्यक्तींचा विश्वास बसणें कठीण आहे. पण तें सोडून दिलें तरी ब्रह्मेंद्रस्वामी खरोखरीच एवढा थोर पुरुष होता किंवा काय असा संशय वाटतो. श्री. पारसनीस यानींहि या स्वामीस फार धन्यवाद दिले आहेत. पण इतिहासाचार्य राजवाड्यांनीं मात्र आपल्या ऐतिहासिक प्रस्तावनेंत या विषयाला बरींच पानें दिलीं असून ऐतिहासिक पुराव्याच्या आधारें ब्रह्मेंद्रस्वामी हा एक साधा, स्वार्थी, अदूरदृष्टि, हलक्या मनाचा मनुष्य होता असें प्रतिपादल्याचें मला स्मरतें. त्यानीं अनेक प्रसंग आणि पत्रें याचा उल्लेख करून शेवटीं रामदास आणि ब्रह्मेंद्र यांची तुलना केली आहे आणि १, २, ३, असे मुद्दे काढून २०।२५ मुद्यांत दोघातील अन्तर स्पष्ट केलें आहे. अर्थात् ब्रह्मेंद्र स्वामींचें शाहू, बाजीराव, आंग्रे या सर्वांवर वजन होतें हें खरें. पण राजकारणात ते त्याला फारसें मानीत होते असें दिसत नाहीं. आंग्रे तर त्याना पुढें विचारीनासाच झाला. ब्रह्मेंद्रानें आपल्या खाजगी गोष्टीकरिता आणि स्वार्थाकरिता उलट सर्वांना त्रासच दिलेला राजवाड्यानीं वर्णिला आहे. तो सावकारीहि करीत असे आणि खुद्द बाजीरावालाहि तो त्या बाबतींत त्रास देत असे. एकाच व्यक्तीबद्दल दोन अगदीं भिन्न मतें वाचल्यामुळें अर्थात् सामान्य वाचकाला मोठाच प्रश्न पडतो. पण एकंदरींत राजवाड्याचें ऐतिहासिक आधारासह दिलेलें मत जास्त सयुक्तिक वाटतें. नाहीं तरी, रामदासाइतका किंवा त्यांच्या कांहीं अंशानेंहि महाराष्ट्रात ब्रह्मेंद्रस्वामींचा बोलबाला नाहीं ही एक दुसरी गोष्ट आहेच.

सावरकरांची या पुस्तकातील भाषा जोरदार आणि प्रतिभायुक्त आहे. महाराष्ट्राबाहेरील लोकांकरितां मुद्दाम त्यांनीं हें पुस्तक इंग्रजींत लिहिलें आहे. सगळें पुस्तक वाचल्यावरच त्याबद्दल पूर्ण लिहावें हें चांगलें.

●

६-३-४३

मध्यंतरीं गांधींच्या उपवासाच्या गंभीर बातम्या येऊं लागल्यामळे आमचा वैद्यकीय वर्ग बंद होता. आज पुन्हा तो सुरू झाला. पूर्वीची सर्व मंडळी येत आहेत. डॉ. **भास्कर पटेल** मोठे उत्साही गृहस्थ आहेत ते मोठे कडक राष्ट्रीय वृत्तीचे आहेत. प्रत्येक प्रश्नाकडे राष्ट्रीय दृष्टीनें पाहिलें पाहिजे असा त्याचा आग्रह असतो. इंग्रजीवर त्याचे उत्तम प्रभुत्व आहे त्यामुळें आपल्या मनातील विषय त्याना चांगल्या रीतीनें मांडता येतो. त्याची मातृभाषा गुजराथी. मराठी त्याना समजते. चांगलें बोलता येत नाहीं. एखादे वेळीं बोलण्याचा प्रयत्न करतात त्या वेळीं ते स्वतःहि हसतात आणि दुसऱ्यानाहि हसवतात ते गुजराथमधील खेडा जिल्ह्यातील रहिवासी आहेत. मुंबईत इंटर, एम्.बी.बी.एस्. झाल्यावर जर्मनीला गेले व तेथें बरीच वर्षे राहूनM D. होऊन आले १९३०–३२ सालच्या चळवळींत ते होतेच. ते **धुळ्याच्या तुरुंगांतून** त्यावेळीं सुटले त्यावेळीं त्याचें स्वागत करण्याकरितां गेलेल्या मंडळींत मीहि होतों. त्यावेळींच मी त्याना प्रथम पाहिलें होतें त्यानंतर येथेंच पाहिले पूर्वीहि अनेक राष्ट्रीय कार्यक्रमाशीं ते संलग्न असत, असे त्याच्या बोलण्यावरून वाटतें. गांधींच्या बरोबर खादी कार्यांत अगदीं प्रथमपासून असणारे श्री **लक्ष्मीकांत** (अहमदाबाद)याना भास्करभाई गुरुप्रमाणें पूज्य मानतात आणि त्याना **दादा** म्हणतात त्याची वृत्ति मोठी धाडशी आहे आणि ते काहींसें अधीर मनाचे आहेत. चेहरा उभा, भव्य आहे आणि नाक चांगलें मोठें आणि सरळ आहे, त्याचा पूर्ण पोशाख म्हणजे पांढऱ्या खादीची सुरवार, पांढरा गळ्याजवळ बटन असलेला पण आंखूड कोट आणि पांढरी खादीची टोपी. पण हा झाला पूर्ण पोशाख. त्यांचा इतर वेळचा पोशाख म्हणजे रेशमी विजार आणि रेशमी शर्ट. त्याना रेशमी कपडे वापरण्याची मोठी आवड दिसते आणि त्याचे एरवी वापरावयाचे कपडे सर्व रेशमीच आहेत. नेहमी रेशमी कपडे वापरण्याचीच त्याची कित्येक वर्षांची संवय आहे. म्हणून त्यावरून श्री. **बाळुभाई मेहतांच्या 'वैभवशाली हिंदुस्थान'** या पुस्तकांतील एका वर्णनाची मला आठवण झाली. तें पुस्तक

मी नुकतेंच वाचलें. त्यात वस्त्र-विद्या या प्रकरणात बाळुभाईंनीं Saunder's Economic Condition of Ancient India' ( सॉंडरच्या ' प्राचीन भारतवर्षांतील आर्थिक परिस्थिति या पुस्तकाधारें खालील माहिती लिहिली आहे:—

रामायणकालीं राष्ट्र इतकें संपन्न होतें कीं, रेशमी वस्त्रें वापरण्याची फॅशन किंवा रूढी पडलेली दिसून येते. **सीतेनें** नवोढा या नात्यानें जेव्हा **दशरथाच्या** राजवाड्यात प्रवेश केला तेव्हा रेशमी वस्त्रच परिधान केलें आणि दशरथाच्या राण्यानीं रेशमी वस्त्रातच तिचें स्वागत केलें. तसेंच **भरत** हा जेव्हा **रामास** भेटावयास गेला तेव्हा त्याचा पोशाखहि रेशमीच होता. **रावण** निजताना सुद्धा रेशमी कपडे घालून निजत असे.·सीता दंड-कारण्यात जेव्हां विरहदुःखानें विव्हळत बसली होती तेव्हा तिच्या अंगावर रेशमीच लुगडें होतें.

ही झाली राजघराण्यातील स्त्रीपुरुषाची गोष्ट ! सामान्य लोकांचा पोशाख रेशमी नसेल अशी या ठिकाणीं शंका येणें साहजिक आहे. परंतु साधारण दासीचें लुगडें सुद्धा रेशमीच होतें असें रामायणाच्या अयोध्या-कांडांतील वर्णनावरून स्पष्ट होतें !

रामायणकालातील ही प्रथा भास्करभाईंनीं अजून चालविलेली दिसते.

* * *

डॉ. **भास्कर पटेल** हे नेहमीं दुसऱ्याला मदत करायला तत्पर असतात. त्यामुळें कोणाशहि काहीं प्रश्न पडल्यास ते त्याच्याकडे जातात. आजारी माणसाची शुश्रूषा ते विशेष काळजीनें करतात आणि त्याच्या सूचना कोणीं पाळल्या नाहींत तर तें त्यांना आवडत नाहीं. त्यांच्याबरोबर संभाषण करणें मोठें मनोरंजक असतें. कोठूनहि त्यांच्या हंसण्याचा आवाज सहज ओळखूं येतो. त्याना सुखांत बसणे आणि पहूडणें आवडतें. त्यांच्या खोलींत आरामखुर्चीं आणि मऊमऊ गाद्या आणि उशा या साधनाचा भरपूर उपयोग केला आहे. मुंबईला त्यांच्या घरींहि असेंच आहे असें ते सांगतात. ४-६ वर्षांपूर्वीं ते इंग्लंडला गेले व तेथून M.R.C.P. आणि T.D.D. या दोन

पदव्या घेऊन आले. ते सध्या जे. जे. हॉस्पिटलमध्यें क्षयविभागाचे प्रमुख आहेत.

त्यांनीं Dhulia tea ( धुलिया टी ) नावाचा एक नवीन वाक्प्रचार येथें रूढ केला आहे. ते ३२ सालीं धुळयाला तुरुंगात होते. तेव्हा त्याना 'क' वर्ग देण्यात आला होता. त्या वेळीं त्याना चहा कोठून मिळणार! म्हणून ते सकाळीं उठल्यावर चागलें मोठें भांडें भरून पाणी पीत असत. चहाची जागा तेथें पाण्यानें घेतली होती. त्यावरून नुसतें पाणी पिणें याला ते विनोदानें Dhulia tea म्हणतात. त्यानीं येथें 'क्षय' आणि 'अन्न' या दोन विषयावर सर्वांकरिता काहीं व्याख्याने दिलीं. सगळया जेलमध्यें व्हिटॅमिन आणि 'कॅलरी' हे शब्द त्याच्याचमुळें रूढ झाले आहेत. खाण्यापिण्याच्या प्रत्येक पदार्थांतलि द्रव्यें त्याना तोंडपाठ आहेत आणि तींहि आकडेवार. त्यामुळें कोणताहि पदार्थ घेतला कीं, त्यात किती प्रमाणात प्रोटीन आहे, चरबी किती आहे, साखर किती आहे, त्या सर्वांची उष्णता उत्पन्न करण्याची शक्ति किती आहे ( Calorie value ) हें ते झटकन सागतात. डॉक्टराच्यात सुद्धा सहसा कोणाच्याच इतकें सगळें लक्षात राहत नसतें. त्याना तुम्ही कोणत्या पुस्तकाचा अभ्यास मुद्दाम केला असें विचारलें, तर ते म्हणतात निराळीं पुस्तकें कशाला हवीं? मोठ्या Text books मधून, त्याची जेथें जेथें माहिती विषयानुरोधानें येतें तेथें तेथें ती लक्षात ठेवावयाची. मला तशी संवयच झाली आहे आणि इतराच्या सुद्धा ती माहिती लक्षात कां राहूं नये काहीं कळत नाहीं! ते म्हणतात त्याप्रमाणें प्रत्येक डॉक्टर आणि वैद्यानें खाद्य आणि पेय पदार्थांतील द्रव्याची चागली माहिती करून घेऊन तिचा रोग्याच्या बाबतीत उपयोग करून घेतला पाहिजे. निरनिराळ्या रोगात शरिरातील इंद्रियांत काय फरक होतो (pathology) हें डॉक्टराना माहित असतें. त्यामुळें त्या रोग्याला पथ्य सांगावयाचें तें ठरवितांना त्या रोग्यानें कोणते पदार्थ खावे हें नुसतें न सांगता ते प्रत्येकीं किती प्रमाणांत आणि कशा स्वरूपांत खावे हेंहि सांगितलें पाहिजे आणि तें सागावयाचें म्हणजे प्रत्येक पदार्थांत निरनिराळे द्रव्यगुण किती प्रमाणांत वास करतात आणि त्यांची उष्णता उत्पन्न कर-

ण्याची शक्ति किती हेंहि माहित असावयास पाहिजे आणि तेंहि तोंडपाठ. नाहीं तर पुस्तकें पाहून सांगावयाचें म्हणजे तें काम वेळेवर होत नाहीं. हें त्यांचें म्हणणें अक्षरश: खरें आहे

*　　　*　　　*

आमचें आकाशनिरीक्षण चालूंच आहे. अजून सगळीं तारामंडळें निश्चित ठरलीं गेलीं नाहींत. पण **उमाशंकर** म्हणतात, 'येथून जाण्यापूर्वी एकहि महत्त्वाचा तारा अगर तारामंडळ आपण निश्चित केल्याशिवाय राहणार नाहीं. An Outline of Modern Knowledge ( अर्वाचीन ज्ञानाची दिशा ) या पुस्तकात Astronomy (खगोलशास्त्र) या विषयावर एक विभाग लिहिलेला आहे, सुमारे ४५ 'पानाच्या बारीक टाइपाच्या या मजकुरात तप शीलवार हकीगत नाहीं. फक्त तात्त्विक माहिती आहे. ताऱ्याचे आकार, अंतर, त्याचें स्वरूप इत्यादि कसे ठरवतात यासंबंधीं विवेचन आहे. इतरहि फार सुंदर आणि महत्त्वाची माहिती आहे. ती मधून मधून वाचतों. लेखाच्या शेवटीं खगोलशास्त्रावरील काहीं पुस्तकाची पत्त्यासह नावें दिलीं आहेत. त्यापैकीं काहीं पुस्तकें मिळूं शकतात किंवा काय पाहावयास पाहिजे.

## ८-३-४३

कालचा दिवस पुन्हा सुटीचा होता. म्हणून काल नित्याचें ठरलेलें वाचन आणि लेखन काहींहि केलें नाहीं. आजच्या दिवसाचा पुष्कळसा भाग खोलीबाहेरच काढला. अर्थात् दुसऱ्या कोणाला त्रास होऊं नये याची काळजी घेतली. सकाळीं **आपटे गुरुजींच्या** कडे गेलों होतों. तेथें प्रो. **घारपुरे** बसलेच होते. गप्पा चालल्या होत्या. गप्पा मारता मारता मनुष्य-स्वभावाबद्दल सर्वसामान्यत: विषय निघाला. प्रत्येकजण आपापले अनुभव सांगत होता. आपटे गुरुजींनीं एक गोष्ट सांगितली. ते म्हणाले, "एक मनुष्य होता. त्यानें असें वाचलें होतें कीं, प्रत्येकाला त्याचीं स्वतंत्र मते असतात आणि त्याप्रमाणें त्याला वागूं द्यावें. पुढें त्याचें लग्न झालें तेव्हां त्यानें

ठरविलें कीं, आपल्या पत्नीला जीं वस्त्रें लागतील, तीं तिचीं तिने निवडावीं, आपण त्यात हात घालूं नये म्हणून त्यानें असा क्रम ठेविला कीं, नेहमी पत्नीच्या हातात पैसे द्यावयाचे आणि तिला, तुला लागतील तसलीं पातळें आण म्हणून सांगावयाचें. आपली आवड निवड तिच्यावर आपण लादत नाहीं, उलट आपण तिला तिच्या मताप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य देतों यातच तो खूष होता. अशा रीतीनें दहा वर्षें निघून गेलीं. एके दिवशीं त्याची बायको त्याच्यावर रागावली. त्यानें विचारले, 'मी तुला सगळ्या गोष्टींत मतस्वातंत्र्य देतो आणि तरीहि तुझी तक्रार आहे हें कसे ?' ती म्हणाली, 'तसले स्वातंत्र्य घेऊन करायचे काय मला ? कधीं तुम्ही माझ्याबरोबर येऊन हे पातळ घे, ते बरें नाहीं दिसत, तुला हें पातळ बरे दिसेल, मला तसला रंग आवडत नाहीं, असे कधीं हौसेनें केले आहे ? मी आपलें कसलेंहि पातळ आणले तरी तुम्ही बरेंहि म्हणत नाहीं आणि वाईटहि म्हणत नाहीं ! माझ्याबद्दल काहींतरी आस्था दाखविली आहे का तुम्ही ?" पत्नीचें हें उत्तर ऐकल्यावर तो मनुष्य सर्द झाला. त्याचे डोळे उघडले. दुसऱ्याला स्वातंत्र्य द्यावयाचें याचा खरा अर्थ काय तो त्याच्या ध्यानात आला आणि मनुष्याचे विशेषतः स्त्रियाचें मानसशास्त्र ही एक महत्वाची गुंतागुतीची बाब आहे हें त्याला पटलें. कित्येकवेळा मनुष्याला पूर्ण स्वातंत्र्य नको असतें, प्रेमाच्या माणसावर अवलंबून राहण्यातच त्याला सुख वाटत असतें. हा एक विरोधाभास— वदतोव्याघात—वाटतो खरा. पण मानवी मनाची गुंतागुंत यातच आहे आणि त्याच्या सुखाचें आणि परस्पराकर्षणाचें रहस्यहि त्यातच आहे."

त्यानंतर आम्ही निरनिराळ्या विषयावर बोललों आणि मग पांगलों.

* * *

**इब्न बतूतच्या** प्रवासवृत्तात अनेक मनोरंजक गोष्टी आढळतात. उदाहरणार्थ कैरो शहराचें त्यानें असें वर्णन केलें आहे—असें म्हणतात कीं, कैरो शहरात १२००० पाणीवाले आहेत; ते उंटावरून पाणी आणतात, माळवें आणि खेचरें भाड्यानें देणारे ३०००० लोक आहेत आणि सुलतान आणि त्याची प्रजा यांच्या ३६ हजार बोटी आहेत. त्या बोटींचा उपयोग

व्यापाराकरिता करतात. तेथील एक इस्पितळ इतकें मोठें असल्याचें इब्न बत्तूत लिहितो. कीं, 'त्या इस्पितळात ( Mandan ) उपचाराचीं साधनें आणि औषधें अपरिमित आहेत आणि तेथील दररोजचें उत्पन्न १००० दिनार आहे.'

सीरिया आणि ईजिप्त याच्या सरहद्दीवरील एका ठिकाणाची मौज त्याने दिली आहे. तेथें ( Qatya ) रात्र पडूं लागताच तेथील वाळू ( तेथें सगळीकडे वाळवंटेंच आहेत ) साफ करण्यात येते. वाळूवरील सर्व खुणा नाहींशा करण्यात येतात सकाळीं तेथील अधिकारी ( Governor ) तेथे येतो आणि वाळू तशीच साफ आहे किंवा नाहीं पाहतो. जर त्यावर काही खुणा अगर पावलें उमटलेलीं त्याला दिसलीं तर तो आपल्या अरब नोकराना त्या खुणा ज्यानीं केल्या असतील त्याना शोधून आणावयास सागतो आणि मग ते त्याच्या शोधात इतस्ततः जातात आणि त्याना पकडून आणतात. त्याना तो अधिकारी मग, त्याला योग्य वाटेल ती शिक्षा करतो.

ट्रिपोली ( Atrabulus ) येथील अधिकारी सिंदामूर याची एक गोष्ट बत्तूतनें सागितली आहे. तो फार न्यायी असे आणि गुन्हा करणारास कडक शासन करी. एकदा एका बाईनें त्याच्याकडे तक्रार केली कीं, त्याच्या तैनातींतील एका अमलदाराने ती विकत असलेलें दूध जबरदस्तीनें घेऊन तें पिऊन टाकलें. तिच्याजवळ पुरावा काहींच नव्हता, पण सिंदामूरनें त्या मनुष्याला बोलावणें पाठविलें. तो आल्यावर त्याचे दोन तुकडे करण्यात आले आणि त्याच्या पोटातून दूध बाहेर पडले.

मक्केमधील लोक किती प्रामाणिक असत याचे त्याने एक उदाहरण दिलें आहे. मक्केतील बाजारात गरीब, पोरकी मुले दोन टोपल्या घेऊन बसतात. एखादा मनुष्य बाजारात गेला म्हणजे तो धान्य, भाजी, मास वगैरे विकत घेतो आणि त्या मुलापैकीं एखाद्याला तें घरीं नेण्याचें काम देतो. मुलगा धान्य एका टोपलींत आणि मांस व भाजी दुसऱ्या टोपलींत घालतो व तें सर्व सामान त्या मनुष्याच्या घरीं घेऊन जातो. तोंपर्यंत तो मनुष्य दुसरीकडे आपल्या कामाला निघून जातो व मग सावकाश घरीं परततो. पण त्या मुलानीं सामान पळविल्याचें एकहि उदाहरण नाहीं.'

अशाच आणखी कितीतरी गमती गमती पुस्तक वाचतांना दररोज आढळतात. निरनिराळ्या प्रवासवृत्तांतील अशा मनोरंजक गोष्टी एकत्र केल्या पाहिजेत.

●

## ९-३-४३

आज येथून ५।६ लोक हिंडलग्याला नेणार असल्याचें कळलें. उद्यां त्याना येथून नेण्यात येणार आहे. त्या मंडळींत श्री. **गोविंदराव देशपांडे** आणि **माधवराव जानोरकर** हीं आमच्या बॅराकमधील दोन मंडळी आहेत. गोविंदराव हे महाराष्ट्राला चागलेच परिचित आहेत. महाराष्ट्रातील एक प्रमुख वक्ते आणि कार्यकर्ते म्हणून ते प्रसिद्ध आहेत. सध्या ते प्रांतिक कॉं. कमिटीचे चिटणीसहि होते. गेल्या १०।१२ वर्षांत त्याचीं ४।५ वर्षें तुरुंगातच गेलीं आहेत. या खेपेला त्याना पकडलें त्यावेळीं ते नुकतेच कोठें २ महिने बाहेर होते. त्यापूर्वीं त्यानीं २० महिने येथेंच तुरुंगात काढले होते. ते दोन महिने बाहेर होते त्यापैकीं त्याचे बहुतेक दिवस महाराष्ट्रात दौरा काढण्यातच गेले. आयुष्यातील वर्षानुवर्षें तुरुंगात गेलीं तरीहि त्यागी मंडळी आपल्या जबाबदारीची धुरा आनंदानें वाहतात. तेव्हा त्याना धन्यवाद दिल्याशिवाय राहवत नाहीं. येथें ते दररोज पहाटे लवकर उठतात. खोली स्वच्छ करतात आणि शौचमुखमार्जन करून थंड पाण्यानें स्नान करतात. त्यानंतर **डॉ. खाडिलकर, डॉ. भास्कर पटेल,** श्री. **नारायणराव चौधरी,** व **वि. चिं. पवार** ( नाशिक ) इत्यादि मित्राबरोबर ते नियमानें फिरण्याचा व्यायाम घेतात. कधीं कधीं **आपटे गुरुजी** आणि प्रो. **घारपुरेहि** त्याच्याबरोबर असतात. पण त्याचें फिरणें म्हणजे काहीं तोंड मिटून चाललेलें नसतें. चागल्या गप्पा चालू असतात आणि त्या लाबूनहि ऐकूं येतात. त्यांच्या खोलींत नेहमीं राजकारणावर चर्चा चाललेली असते आणि गुजराथ, ठाणें, मुंबई वगैरे ठिकाणचे सर्व बराकीमधील लोक त्यांच्याकडे नेहमीं येतात. त्याची खोली म्हणजे सार्वजनिक जागाच आहे असें म्हणावयास

हरकत नाहीं. दुपारीं वर्तमानपत्रें आलीं कीं, त्याच्या खोलींत काहीं मंडळी जमतात आणि गोविंदराव वाचून दाखवितात आणि इतर मंडळी ऐकतात. हा दररोजचा कार्यक्रम चालू आहे. पण उद्यापासून त्याला खंड पडणार! ते उद्या जाणार म्हणून मंडळी त्याना भेटण्यास सारखी येत आहेत.

दुसरे म्हणजे आमचे **माधवराव जानोरकर!** माधवराव म्हणजे मूर्तिमंत उत्साह आहेत. ते नेहमीं काहीं तरी कामात गुंतलेले असावयाचेच. कोणालाहि काहीं गरज लागली कीं, त्यानें माधवरावाना जाऊन सागावें, कीं त्यानीं तें केलेंच! त्याच्या चेहऱ्यावरून त्याची चाळिशी उलटली आहे असे वाटत देखील नाहीं. ते नेहमीं हंसतमुख असतात. त्याना कपडे व्यवस्थित वापरणें फार आवडतें असें दिसतें. ते काहीं वेळां सूटबूटहि घालतात. मध्यंतरीं काहीं दिवस ते आमचीं पत्रें ऑफिसमधून आणणें, नेणें, कुणाची काहीं कामें वगैरे असलीं तर तीं करणें असें करीत असत. त्यावेळीं Letter, work, Suggestion (पत्र, काम, सूचना) असें प्रत्येक खोलीसमोरून म्हणत ते गेले कीं, आम्हीं खोलीबाहेर येऊन त्याना कामें सागत होतों. त्यानीं आपल्या खोलीजवळ एक फलक लावला होता. त्यावर ते सर्वांना कळावा असा काहीं मजकूर असल्यास तो कागदावर लिहून चिकटवीत. त्याचा आम्हाला फार उपयोग होत असे.

हे दोघेहि उद्या जाणार असल्यानें अर्थातच आम्हा सर्वांना फार वाईट वाटत आहे. तुरुंगातील जीवन हें असें आहे. मृत्युलोकातील जीवनातील गाठीं भेटी 'यथा काष्ठंच काष्ठंच समेयाता महोदधौ' या वचनानें सुचविल्या जातात. तुरुंग हें एक निराळें जग आहे आणि वरील योगायोगाचा अनुभव येथें जास्त पटतो. कोणाचीहि शाश्वति नाहीं. कुणाला केव्हा, कुठें नेतील याचा काहीं नेम नाहीं. आणि आम्ही तुरुंगात तरी किती दिवस राहणार याचाहि काहीं निश्चित अंदाज नाहीं. मधून मधून काहीं नवीन लोक येतात आणि येथून काहीं दुसऱ्या तुरुंगात जातात अगर शिक्षा होऊन आले असले तर मुदत संपल्यावर बाहेर सुटून जातात.

* * * *

आज डॉ. बी. सी. रॉय यांच्या महात्मा गांधींच्या उपवासाबद्दल झालेल्या एका भाषणाचा सारांश वर्तमानपत्रात आला आहे. त्यात काहीं महत्त्वाचीं वाक्ये आहेत तीं अशीं:—I do not know why providence has saved me on this occassion, possiby it is because he has some more mission for me to fulfil, ( या प्रसंगीं परमेश्वरानें मला जीवदान का द्यावें हे मला कळत नाहीं. कदाचित् माझ्याकडून त्याला आणखी एखादें सुकर्म घडवून आणावयाचें असेल, ) असें महात्माजी डॉ. बी. सी. रॉय यांच्याजवळ बोलल्याचें डॉ. रॉय यांनीं या व्याख्यानात सांगितले डॉ. रॉय यांचीं आणखी काहीं वाक्यें अशीं आहेत:—'Mahatmaji started his fast with prayers and he ended his fast with prayers and throughout the period he had kept himself in tune with Infinity. Day in and day out while he was being nursed by doctors and nurses he was always in a state of communion with Higher Power.' ( महात्माजींनी उपवासाची सुरवात व समाप्ति प्रार्थनेनेंच केली. आणि सर्व उपवासाचे काळात ते ब्रह्माशीं एकरूप अवस्थेंत होते. दिवसा व रात्रीं डॉक्टर व नर्स यांनीं त्यांची शुश्रूषा चालविली असताना उच्चशक्तीशीं ते एकरूप असत. )

डॉ. रॉय यांच्यासारख्या आधुनिक शास्त्रीय ज्ञानात मुरलेल्या बुद्धिवान् गृहस्थानें हे उद्गार काढले आहेत हें लक्षात घेण्यासारखें आहे. गांधींच्याविषयीं त्यांच्या मनात जी भक्ति आहे त्या भक्तीमुळे अगर लोकाना खूष करण्याकरिता काहीं त्यानीं हे उद्गार काढलेले नाहींत. वरचे शब्द त्यानीं अगदीं मनापासून बुद्धियुक्त श्रद्धेनें काढले आहेत याविषयीं शंका वाटत नाहीं. पण मला मात्र Communion with Higher power आणि in tune with Infinity (ब्रह्माशीं, उच्च शक्तीशीं एकरूप होते.) हीं विधानें तितकींशीं पटत नाहींत. गांधी हे थोर पुरुष आहेत. त्यांची तपश्चर्या दिव्य आणि पवित्रतम् आहे. त्यांचा आत्मा शुद्ध आणि उन्नत आहे, या सर्व गोष्टी मला पटतात. पण त्यांचा उच्चतर शक्तींशीं संयोग होत होता हें विधान मात्र मानण्यास

मन लवकर तयार होत नाहीं. ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल साशंकता हें त्याचें कदाचित् कारण असूं शकेल किंवा परमेश्वर म्हणून कोणी आहे, तशी एक चिच्छक्ति चराचरात भरून राहिली आहे असें श्रद्धापूर्वक मानलें तरी त्याच्याशी मानवी प्राण्याचा–त्याच्या आत्म्याचाहि–संयोग काहीं काळ त्याच्या आयुष्यातच होऊं शकतो हे मानणें जरा कठिणच वाटतें. हा केवळ भावनेचा प्रश्न आहे. बुद्धिवादानें हा प्रश्न सुटण्यासारखा दिसत नाहीं. व्यक्ति कितीहि थोर असली तरी तिच्या ठायीं अतिमानुष शक्तींचा वास असेल असें मला वाटत नाहीं. अनेक श्रद्धावान् भक्तांची समाधि लागते, त्याना परमेश्वराचें साक्षात् दर्शन होतें, किंवा त्याच्या अस्तित्वाचा त्याना साक्षात्कार होतो असें म्हणतात, पण मला ते काहीं चागलेंसें पटत नाहीं. चागलेसें म्हणण्याचें कारण असें कीं, एकीकडे विश्वास ठेवण्यास मन तयार होत नाहीं, तर दुसरीकडे या चमत्कृतिपूर्ण विश्वात काय काय गूढ चमत्कार भरले आहेत त्यांचे पूर्ण ज्ञान मनुष्यास झालें नसल्यानें अमुक एक गोष्ट खोटीच आहे असें आग्रहानें म्हणण्याचा अहंकार दाखविणें इष्ट वाटत नाहीं. मात्र भलत्याच गोष्टीवर विश्वास ठेवायला लावण्याची गाधींची पद्धति नाहीं. आपल्या अंगीं काहीं गूढशक्ति वास करीत आहे असें गाधी स्वत. खुद्द कधींच म्हणत नाहींत. उलट मनुष्याच्या अंगीं असलेली दुर्बलता आपल्याहि ठिकाणीं आहे याची जाणीव ते स्वतः ठेवीत असतात व दुसऱ्यानाहि देतात. त्यामुळे डॉ. रॉयसारख्या प्रसिद्ध चिकित्सक विद्वानाचा अभिप्राय–त्यांनीं पूर्ण गाभीर्यानें केलेलें विधान–मनाची चलबिचल करते. त्याचें कोणीहि समाधान करूं शकत नाहीं. आणि मग शेवटीं मनाचे समाधान होण्याची शक्यता दिसेनाशी झाली म्हणजे अस्वस्थ चित्तानें दुसऱ्या कामात लक्ष गुंतवावें लागतें. विश्वाचें हें गूढ मनुष्याला केव्हा उकलणार ! खुद्द गांधी आपल्या अंगीं काहीं दिव्य शक्ति आहेत असें मानीत नाहींत. पण त्याचा 'आतला आवाज' (Inner voice) हें काय प्रकरण आहे ? या आंतल्या 'आवाजाचें' स्पष्टीकरण मात्र शास्त्रीय चिकित्सेनें करता येण्या-जोगें आहे. त्यांच्या विरोधकांप्रमाणें त्या आवाजाचा उपहास करण्यात अर्थ नाहीं आणि त्यांच्या काहीं अंधभक्ताप्रमाणें तें काहीं एक गूढ आहे,

गांधींच्या अंगीं असलेल्या कांहीं गूढ शक्तींचा तो एक परिपाक आहे असें समजण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. अंगीकृत कार्याच्या सतत चिंतनानें शुद्ध, भावनायुक्त, त्यागी मनाला आपोआपच पुढील मार्ग स्वच्छ दिसतो, तशी दिव्य दृष्टि त्याला आलेली असते. तो त्याच्या मनाच्या तळमळीचा परिपाक असतो. योग्य तोच विचार त्याला संदेहकालीं स्फुरतो आणि त्याची कार्यकारणमीमांसा ही लौकिक व्यवहाराच्या नियमाप्रमाणें लावण्याचें काम सहज साधण्यासारखें नसल्यानें त्या सहजस्फूर्त संदेशाला आपण गूढ समजतों. गूढ म्हणजे समजण्यास कठीण एवढेंच नव्हे तर गूढ म्हणजे ज्या ठिकाणीं मनुष्याहून उच्चतर शक्तीचा संबंध येतो ती अवस्था! जगाच्या सुरुवातीपासून हा प्रश्न सुटलेला नाहीं आणि पुढे केव्हा सुटेल कोणास ठाऊक?

●

## १०–३–४३

आज सकाळीं श्री. गोविन्दराव देशपांडे, माधवराव जानोरकर, बटुक देसाई, अजित देसाई, रामप्रसाद कॉंट्रॅक्टर ही मंडळी हिंडलग्यास नेण्यात आलीं. सकाळपासून सगळ्या बराकींमधून गडबड चालू होती. गाठीभेटी–निरोप चालले होते. शेवटीं सगळे जावयास निघाले तेव्हा बहुतेक सर्व मंडळी त्यांना पोंचवावयास वार्डाच्या दाराजवळ आली होती. घरातील नातेवाईकच दूरदेशीं जात असावेत असें वाटण्यासारख्या सर्वांच्या भावना उचंबळीत झाल्या होत्या. विशेषतः, जाणाऱ्या मंडळीचे विशेष ऋणानुबंधी मित्र तर ओल्या डोळ्यानेंच त्यांना निरोप देत होते. पुन्हा केव्हां भेट होणार कोणास ठाऊक असें प्रत्येकास वाटत होतें. शेवटीं जड हृदयानें त्यांनीं सर्वांचा निरोप घेतला व आम्हीहि तितक्याच जड अन्तःकरणानें खोल्याकडे परत फिरलों. एकाच पवित्र यात्रेचे प्रवासी आम्ही! आमच्यात कार्यैकतेमुळें केवढें परस्पर बंधन उत्पन्न होत आहे!

आणखीहि कांहीं लोक लवकरच दुसरीकडे पाठविले जातील असा कांहींजणांचा अंदाज आहे. सगळें वातावरण अनिश्चिततेनें भरलें आहे. सारें

स्वप्नवत् वाटतें. त्या भासमय वातावरणांत आमचे दैनिक व्यवहार चालू आहेत. मी मात्र अगोदरच कोणत्याहि प्रसंगाला तयार राहायचें ठरविलें असल्यानें मला अधीरता अगर अशांतता वाटत नाहीं आणि अशांततेचें कारण काय ?

*　　*　　*

माझ्या घरीं धुळ्याला ' मराठी-बंगाली शिक्षक ' हें पुस्तक होतें. तें मी मागविलें होतें, तें आज मला मिळालें. तें पुस्तक १९१९ सालीं छापलें असून त्यावर माझ्या वडिलांच्या हस्ताक्षरात माझें संपूर्ण नाव व ' दाखल ता. २१-२-१९ ' लिहिली आहे. त्यावरून त्यांनीं तें पुस्तक प्रसिद्ध झाल्या-बरोबर तावडतोब घेतलेलें दिसतें. मला तें पुस्तक फार आवडतें. त्या पुस्तका-वरून मी बंगाली चांगलें वाचावयास शिकलों होतों पण तें कित्येक वर्षांपूर्वी ! बंगाली वाचावयास येऊं लागल्यावर त्या पुस्तकात दिलेल्या पत्त्यावर मी कलकत्त्याला ' सीतार बनबास ' व इतर कांहीं पुस्तकें मागविलीं. पण कांहीं उत्तरहि आलें नाहीं व पुस्तकेंहि आलीं नाहींत. झालें ! मी पुढें कांहींच प्रयत्न केला नाहीं आणि हळूहळू शिकलेलें सर्व विसरून गेलों. पुढें नेहमीं असें वाटत असे कीं, आपण पुन्हा बंगाली चांगलें शिकावें आणि बंगाली वाङ्मयातील रसाचा साक्षात् आस्वाद घ्यावा. पण अंशतः, इतर कामाच्या गडबडीमुळें आणि पुष्कळसें आळसामुळें, उपेक्षेनें प्रत्यक्ष केलें मात्र कांहीं नाहीं. आता येथें वेळ मिळेल असें वाटल्या-मुळें पुस्तक इकडे मागविलें आहे. पण सध्याच त्याचा अभ्यास करावयास सांपडेल किंवा नाहीं सांगता येत नाहीं. कारण तूर्त संकल्पित उद्योग अजून संपावयाचे आहेत. आमचे नवल पाटिल बंगाली बरें वाचतात. येथें कोणा-कडून तरी पुस्तकें आणीत असतात. श्री. नटवरलाल यांच्याकडे बंगाली पुस्तकें बरींच आहेत म्हणतात. श्री. वांद्रेकर यांनाहि बंगाली चांगलें येतें आणि ते येथें शिकवीतहि असत. आचार्य भिसे यांनाहि बंगाली चांगलें येतें म्हणतात. आणखीहि कांहीं लोकांना येत असेल.

*　　*　　*

दोन दिवसांपासून टाईम्समध्यें, सध्यां आकाशांत एक धूमकेतु दिसत

असल्याच्या बातम्या आल्यावरून तो पाहण्यासाठीं आज रात्रीं आम्हीं जमलों. सप्तर्षींपैकीं चौथ्या ताऱ्यापासून पूर्वेला कांहीं अंतरावर एक पुसटसा पांढरा डाग दिसत होता तोच हा नवीन धूमकेतु. याला शेंपुट नाहीं. डॉ. **खाडीलकर** म्हणाले कीं, १९११ सालीं किंवा त्याच सुमारास एक मोठा धूमकेतु आकाशात उगवला होता. आणि त्याचें शेपूट भलें लांब होतें. **वाडेकरांनींहि** आपल्याला तें आठवत असलेलें सांगितलें. सध्या दिसणारा हा धूमकेतु आणि सप्तर्षींपैकीं तिसरा, चौथा आणि पाचवा तारा मिळून एक समांतरभुज चौकोन ( paralellogram ) होतो. धूमकेतु म्हणे पृथ्वीपासून दूर दूर जात आहे आणि तो त्यामुळें पुसट होत चालला आहे. हा धूमकेतु मुंबईत प्रथम **निक्स जेम्स** ( Nix James) या कॅथे-ड्रलस्कूलच्या गृहस्थानीं ता. २८ फेब्रुवारीं रोजीं पाहिला. ता. १ पासून **डॉ. टेलर** ( विल्सन कॉलेज, मुंबई ) हे दररोज रात्रीं तो पाहत आहेत. मुंबईला हा प्रथम दिसला तेव्हा तो ३ ऱ्या व ४ थ्या ताऱ्यामध्यें होता. तेव्हा-पासून तो दक्षिण-पूर्व ( South-east ) दिशेला दररोज ½ डिग्री या वेगानें जात आहे. तो जास्त पुसटहि झाला आहे. तो नुसत्या डोळ्यानीं दिसतो, पण लहानशा दुर्बिणीनें एका पुसट वर्तुळात एक तेजस्वी केंद्र असें त्याचें स्वरूप दिसतें. बहुतेक धूमकेतूंना शेंपूट असतें. पण याला नाहीं. Reinmuth, Nenimin हे दोन धूमकेतू आकाशात दिसूं लागण्याचा संभव आहे. कांहीं धूमकेतू मधून मधून आपणास दिसत असतात. त्यापैकींच हे दोन आहेत. पण ते नुसत्या डोळ्यानीं दिसत नाहींत आणि सप्तर्षींपासून ते फार लांब असतात. म्हणून सध्या दिसणारा धूमकेतु अगदीं नवा असावा असें म्हणतात ! हा कांहीं आठवडे दिसेल असें म्हणतात.

वरील माहिती टाइम्सच्या ता. ९ च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे.

पुष्कळ दिवसांपासून **उमाशंकर दीक्षित** यांच्या मनात आहे कीं, आपण एक लहानशी दुर्बीण येथें बनवावी आणि त्या दुर्बिणींतून तारे पहावे. तसा आमचा प्रयत्न चालला होता. **डॉ. खाडिलकर** यांच्या डोळे तपासण्याच्या पेटींतून कांचा घेऊन दुर्बिण तयार करावी अशी मी सूचना केली होती. पण आज धूमकेतु पाहिल्यावर दुर्बीण तयार करण्याची इच्छा

जास्त तीव्र झाली आाण मी, वाडेकर व दीक्षित, डॉ. खाडिलकर याच्याकडे गेलों व त्याच्याशीं दुर्बिण करण्याबाबत चर्चा केली. पुष्टिपत्राच्या ( Card board ) दोन नळया करून त्यात दोन काचा बसवाव्या असा आमच्या परिषदेचा आज निर्णय झाला. उमाशंकर यानीं एका पुस्तकावरून काचा कशा पाहिजेत, आणि त्याचे अंतर काय असावें वगैरे माहिती शोधून काढली आहे. उद्या हा प्रयोग करावयाचा आहे पाहूं तो कसा काय सफल होतो तो !



## ११-३-४३

मुंबईचे एस्. व्ही. सोपनी हे मोठे उद्योगी गृहस्थ आहेत. ते प्रथम ठाण्याच्या तुरुंगात सेकंड क्लास डिटेन्यू होते. पण पुढें त्याना फर्स्ट क्लास देऊन येथें पाठविण्यात आलें आहे. सध्या ते 'जगाचा चित्रमय इतिहास' ( World History in Graphs ) तयार करीत आहेत. गेल्या खेपेस म्हणजे वैयक्तिक सत्याग्रहाच्या वेळीं ते येथें होते त्यावेळीं त्यानीं या उद्योगास सुरुवात केली. जगाचा सास्कृतिक, औद्योगिक, राजकीय, वाशिक वगैरे सर्व प्रकारचा इतिहास नकाशे आणि आकृती याच्या साहाय्याने रेखाटण्याचें काम त्यानीं चालविलें आहे. एकंदर १०० नकाशे तयार करण्याचा त्याचा हेतु आहे. ते जवळजवळ पूर्ण होत आले आहेत. त्यासाठीं त्याना अर्थात् वाचनहि खूप करावें लागलें आहे. आपणाला उपयोगी पडणाऱ्या अशा पुस्तकाच्या ते शोधातच असतात. आज ते सहज माझ्याकडे आले असताना त्यानीं Lin Yutang या चिनी लेखकाच्या My Country and my people ( माझा देश आणि माझे लोक ) या पुस्तकांतील कांहीं गमती सागितल्या. लेखक म्हणतो कीं, चीनमध्ये दर ८०० वर्षांनीं समान परिस्थिति उत्पन्न होते. मध्यंतरीच्या ८०० वर्षांत अनेक उलथापालथी होतात आणि पुन्हा कांहीं तरी महत्त्वाची क्रातिकारक घटना होऊन तीच इतिहास नव्यानें जुना मार्ग आक्रमूं लागतो. मी अजून तें पुस्तक

वाचलें नाहीं पण वाचणार आहें. वाचनाचें असें होतें कीं, पुस्तकें पुष्कळ असतात आणि आपला वेळ मात्र फार अपुरा असतो. ' शास्त्रें पार अपार जीवित तुझें अत्यल्प रे मानवा' ही कव्युक्ति अगदीं खरीं आहे. येथें तुरुंगांत मुख्य करमणूक आणि उद्योग म्हणजे वाचनच. त्यामुळें बहुतेक सर्वांनीं आपल्या भाषेंत कांहीं ना कांहीं पुस्तकें आणलीं आहेत. बहुतेक सगळ्या विषयांतील लहानमोठया आणि नव्या जुन्या सुंदर पुस्तकांचा संग्रह येथें झाला आहे. तुरुंगाच्या ग्रंथालयात कांहीं विशेष पुस्तकें नाहींत पण मधून एखादेंच ग्रंथरत्न तेथेंहि चमकतें. मी वाचीत असलेलें, Travells by Ebn Battuta (इब्न बतूत याच्या सफरी) हें सुंदर पुस्तक तुरुंगाच्या ग्रंथालयातीलच आहे. पण त्या ग्रंथालयाचा फारसा कांहीं उपयोग होत नाहींच. राजबंदींनीं आणलेलीं पुस्तकें मात्र फार उत्कृष्ट आहेत. निरनिराळ्या विषयांवरील सुंदर सुंदर पुस्तकें पाहिलीं म्हणजे जत्रेंत किंवा नानारंगी, नाना आकाराच्या, चमत्कृति-पूर्ण, आकर्षक खेळण्यानीं भरलेल्या दुकानांत लहान मुलाची जी अवस्था होते तीच आमची होते. निदान माझी तरी होते. नवीन चागलें पुस्तक पाहिलें कीं, तें वाचावेंसें वाटतें. आधाशीपणानें पुस्तकें मागून आणावीं आणि मग त्यातील कांहीं न वाचताच परत करावीं असें होतें. कारण दुसऱ्याचीं पुस्तकें आपल्या एकटयाकडेच ठेवणार तरी किती दिवस ? आणि सगळीं पुस्तकें एकदम थोडींच वाचता येणार ? नव्या पुस्तकाप्रमाणेंच ज्यांचीं नावें पूर्वीं ऐकिलीं आहेत आणि जीं केव्हांतरी वाचण्याचा संकल्प पूर्वीं केलेला असतो, तीं येथें पाहिलीं कीं, जो आनंद होतो तो अनुभवानेंच जाणण्यासारखा आहे ! चिरवांच्छित प्रवास करण्याची संधि मिळाली किंवा ज्याच्या भेटीची तीव्र इच्छा मनांत चिरकाल जाग्रत राहिली आहे, त्या इष्टजनाची भेट झाली म्हणजे जो आनंदोद्रेक होतो त्याशींच या आनंदाची तुलना करता येईल. प्रफुल्ल, हंसऱ्या, टवटवीत फुलांनीं भरलेल्या बागेंत प्रवेश करावा आणि त्या विविधरंगी, सुगंधी वातावरणानें रसिक मनाची चित्तवृत्ति भांबावून जावी अशासारखाच हा प्रकार आहे. फुल्लकुसुमित उद्यानांत शिरल्यावर हें फूल तोडूं किंवा त्या फुलाचा वास घेऊं, या पुष्पवाटिकेंत जाऊन तेथील मधुर सुगंधाची लयलूट करूं, का त्या लताकुंजांतील

शीतल, आल्हाददायक प्रसन्न वातावरणाचा उपभोग घेऊं असें रसिकांस कोडें पडतें. तशीच हुबेहूब अवस्था या विविध विषयावरील ग्रंथसुमनांच्या उद्यानात शिरल्यानें होते. मधुर भाषाशैलीनें वाचकांचें आकर्षण करणाऱ्या ग्रंथाप्रमाणेंच नवविचारांच्या परिमलानें वाचकाचें चित्त मोहून घेणाऱ्या ग्रंथाचीहि येथें काहीं वाण नाहीं. एखाद्या प्रचंड भव्योदात्त दुर्ग-तटाप्रमाणें गंभीर, भव्य विचारांनीं भरलेले भरगच्च ग्रंथ ज्याप्रमाणें आपलें अस्तित्व येथें दर्शवीत आहेत त्याचप्रमाणें कल्पनाचीं नागमोडी वळणें घेऊन उपमा-उत्प्रेक्षांच्या लाटा आपल्या अंगावर नाचवीत नाचवीत दोहीं बाजूंस ज्ञान-रसाचे पाट पोशीत वाहणाऱ्या वाङ्मयगंगाहि काहीं कमी दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. या वाङ्मयसरिताची सोबत करणारे काव्य-निर्झर आपल्या प्रासा-नुप्रासाच्या खळखळाटानें जीवन-रसिकयात्रिकरूंचें मन आपल्याकडे ओढून घेतात न घेतात तोंच आपल्या गंभीर निनादानें भावी संकटाची सूचना देऊन आपल्या परिस्थितीची जाणीव करून देणारे राजकीय ग्रंथकेसरीहि मधून मधून त्याला भानावर आणण्याचें कार्य करीत असतात.

पण या अफाट वाङ्मयसागरात नुसते डुंबणार तरी किती वेळ! आम्हाला येथें मिळणारा वेळ भिंतीबाहेरील जगातील प्राण्यापेक्षा पुष्कळच जास्त प्रमाणात असला तरी जेथें मानवी आयुष्यच मर्यादित आहे तेथें हें कारावासांतील क्षणभंगुर जीवन किती मर्यादित असेल याची कल्पनाच केलेली बरी! म्हणून प्रथमदर्शनीं विस्तृत उद्यानातील विविध फुलांचा बहर पाहून भांबावलेला पाहुणाहि क्षणभरात आपली लोभी वृत्ति आवरून शांत चित्तानें आपली दृष्टि पुन्हां एकदा त्या पुष्पसंपत्तीवरून फिरवितो आणि आपणाला हवीं तीं फुलें चटचट तोडून आपल्या पुष्पपात्रात घालतो, त्याप्रमाणेंच वाङ्मयरत्नांचा दिव्य ढीग समोर पसरला असतानाहि क्षुब्ध मनोवृत्तीस विचारपूर्वक संयमून आपणाला हवीं असतील तेवढीच हिरेमाणकें आपल्या खिशांत घालण्याचा विवेक प्रत्येकाला येथें सुचूं लागतो. येथें आलेलीं पुस्तकें वाचनीयच असतात, कारण प्रत्येक जण निवडक अशींच पुस्तकें येथें आणतो, तथापि आपणाला कोणतीं पुस्तकें वाचावयाचीं आहेत हें ठरवून क्रमाक्रमानें एकदोन पुस्तकें आणून, तीं वाचून परत केल्यावरच दुसरीं

पुस्तकें आणावयाचीं, तोंपर्यंत नाहीं, असा निश्चय करणें आवश्यक होतें. अर्थात् विस्तीर्ण उपवनात विहार करूनहि परडींत (पुष्पपात्रात) मावतील येवढींच फुलें घरीं आणता आलीं अशी हुरहुर मनाला लागल्याखेरीज राहत नाहीं. मला वाटतें बाहेर गेल्यावर नित्यव्यवसायात गुंतल्यावर कांहीं दिवसानीं ही हुरहुर नाहींशी होईल.

आपल्या आवडीचा एखादा विषय निवडून त्या विषयावरचीं पुस्तकें येथें वाचावीं म्हटलें तर तें सहजसाध्य काम नाहीं. कारण तशीं एकच विषयावरचीं पुस्तकें येथें भरपूर असतीलच असे नाहीं आणि जीं कांहीं असतील तीं नेहमीं कोणा ना कोणाच्या सारखीं वाचनात असतात. त्यामुळें तीं लवकर मिळूं शकत नाहींत. मात्र पद्धतशीर claim system सुरूं केल्यास तीं योग्य त्यावेळीं मिळूं शकतील. पण असें एकाच विषयाचे वाचन त्या विषयाचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें योग्य आणि आवश्यक असलें तरी तुरुंगाच्या आधींच्याच कंटाळवाण्या जीवनात तें फारसे मनोरंजक ठरूं शकत नाहीं. म्हणून मी येथें असा क्रम ठेविला आहे कीं, एकाच वेळीं २।३ पुस्तकें निरनिराळया विषयावरील वाचीत राहावयाचें म्हणजे रुचिपालट होऊन कंटाळा येत नाहीं. या दोन तीन पुस्तकांतहि एक पुस्तक विशेष गंभीर, तात्त्विक चर्चा करणारें असेल तर त्याच्या जोडीला एक अगदीं हलकें, कादंबरी लघुकथेसारखें करमणूक करणारें पुस्तक ठेवावयाचें म्हणजे दोन्हीं पुस्तकाचें वाचन मोठ्या सुखानें करता येतें. मानवी मन हें गंभीर आणि मृदु अशा दोन्ही विचाराचें उत्पत्तिस्थान आणि संग्रहस्थान आहे. या दोन्ही विचारप्रवाहात आलटून पालटून विहार करण्यानें त्याची मनोवृत्ति नेहमी ताजी, टवटवीत, उल्हसित राहते. दादा टिळक (धुळयाचे) हे नेहमी असेंच करतात. त्यांच्या वाचनावरून मला ती क्लृप्ति सुचली आणि तिचा फार उपयोग होतो असा माझा अनुभव आहे.

पण कित्येक वेळा मोठी गंमत होते. एखादें चिरवांछित पुस्तक आपण हेरून ठेवावें आणि कृपणाच्या धनाप्रमाणें तें आपण घ्यावयास गेलों कीं, दुसऱ्या कोणी तें लांबविलेलें –अर्थात् वाचायलाच–असावें असा अनुभव येतो. पुन्हा पुन्हा सावधानता बाळगूनहि आपल्या नजरकैदेंतून पळून

जाणारा हा कैदी आपल्या चिकाटीची कसोटी पाहतो. काल हा एक वृद्ध प्राणी असून तो सारखा धावत असतो असा पाश्चात्याचा एक संकेत आहे. त्याच्या डोक्याच्या पुढील बाजूस 'संधि' (opportunity) नावाचा केसाचा एक झुपका आहे. हा वृद्ध प्राणी समोरून धावत येत असता त्याच्या पुढच्या केसाच्या झुपक्याला हात घालून तो पकडला तरच तो हातात येतो. पण एकदा तो क्षण आपण जाऊं दिला कीं, त्या म्हाताऱ्याच्या डोक्याच्या इतर भागावर टक्कल असल्यानें त्याला पकडणे अशक्यच होतें. तो आपला पुढें निघून जातो. इथलीं चांगलीं पुस्तकें या वृद्ध प्राण्याप्रमाणेच पण एका वर्तुळात सारखीं धावत असतात. एकदा तीं दृष्टिपथांतून निसटलीं कीं, कांहीं काल दिसेनाशीं होतात. पुन्हा तीं दिसलीं कीं, त्याच्यावर झडप घातली पाहिजे, नाहींतर चाललीं दुसऱ्या कोणाच्या तरी खोलींत! काजवेच म्हणाना! क्षणभर त्याचा प्रकाश दिसला कीं, आपण त्याला धरायला जावें तोंच तो आपला प्रकाश आवरतो आणि कोठेंतरी निघून जातो. पुन्हा त्याच्या मागें जावें तों तोच प्रकार! आणि आपली दिशा तरी तो किती बदलतो! शेवटीं एकदाचा तो सापडला कीं, आपण त्याला हातरुमालांत अलगद कोंडून ठेवतों. नाहीं तर तो उडून जावयाचा! पाठशिवणीचा खेळ खेळता खेळता एखादे वेळेस आपल्यास हवें असलेलें पुस्तक सापडलें कीं, तें आपलें वाचन होईपर्यंत इतरांपासून जरा लपवूनच ठेवावें लागतें. अशा एक ना दोन किती तरी अडचणी इष्ट ग्रंथप्राप्तींत येत असतात. उदाहरणार्थ, पर्लबकच्या कादंबऱ्या! येथें तिच्यीं ५।७ पुस्तकें तरी आहेत. पण मिळतात कुठें तीं लवकर! परवां तिचें The Patriot हें पुस्तक हेरून त्यावर claim सुद्धा लागू केला. पण तेवढ्यांत तें दुसऱ्या कोणी अगोदर सांगितलें होतें म्हणून नेलें. पुन्हा तें कोठें गडप झालें कुणाला ठाऊक. पुन्हा पुन्हा वर उसळी मारून आपलें अस्तित्व आहे एवढेंच दाखविणारा देवमासाच जणूं! पण त्याची शिकार तरी सोपी असेल!

बहुतेक पुस्तकें गुजराथ व मुंबई येथील लोकांनींच चांगलीं आणलीं आहेत. एकंदरींत महाराष्ट्रीय लोकांनीं फारशीं पुस्तकें आणलेलीं नाहींत. कदाचित् येरवडा जेलमध्यें महाराष्ट्रीय लोकांनीं खूप पुस्तकें आणलीं असतील.

कादंबऱ्यापासून तों साम्यवाद, फॅसिझम, तत्त्वज्ञान, धर्म, राजकारण या सर्व विषयावरील मराठी, इंग्रजी, गुजराथी, हिंदी पुस्तकें आलीं आहेत. अर्थात इंग्रजी पुस्तकाचा भरणा सर्वांत मोठा आहे. वैद्यकीय विषयावरील पुस्तकेंहि वैद्य डॉक्टरानीं आणलीं आहेत. एकंदरींत वाचनाची आवड असणाराला ही चांगली संधि आहे एवढें खरें !

* * *

शेवटीं आमची दुर्बीण आज एकदाची तयार झाली. अहमदाबादचे प्रो. गोळे यांनीं बॅडमिंटनचीं फुलें ज्या पुष्टपत्राच्या नळकांड्यातून येतात त्या नळकांड्यात काचा बसविण्याची युक्ति काढली आणि मग आम्ही ती नळकांडी घेऊन डॉ. खाडिलकरांकडे गेलों. तेथें साधारणपणें एक १६-१८ इंच लांबीचा बिंबबिंदु ( Focus ) असलेली+२½ नंबरची काच व दुसरी २ इंच बिंबबिंदु असलेली +१८ नंबरची काच घेऊन त्या नळकांड्यांत बसविण्याचें ठरविलें. काचा किंचित् मागेंपुढें करता याव्या म्हणून एक नळी दुसरीपेक्षा लहान, मोठ्या नळींत बरोबर बसेल पण फार घट्ट नाहीं, फार सैल नाहीं अशी तयार करण्याचें ठरलें आणि प्रो. गोळे काचा आणि नळ्या घेऊन कामाला लागले. सायंकाळीं त्यांनीं दुर्बीण तयार केली आणि आम्ही पहिला मोर्चा चंद्रावर लावला तों काय ! चंद्र चांगला मोठा दिसूं लागला. त्याच्यावरचे डागहि अधिक स्पष्ट दिसूं लागले. सप्तर्षीवर आम्ही मोर्चा फिरविला. वसिष्ठ आणि अरुंधती हे दोन तारे स्पष्ट दिसूं लागले. वसिष्ठाचा तारा नुसत्या डोळ्यानींहि दिसतोच. पण अरुंधतीचा चांगला दिसत नाहीं. तो या गावठी दुर्बिणींतून चांगला दिसूं लागला. आम्हांला खूप आनंद झाला ! त्याची कल्पना ज्यांनीं असा कांहीं नवा प्रयोग अगदीं किरकोळ सामुग्रीच्या साहाय्यानें केला असेल त्यानाच येऊं शकेल. इतरांना त्याचें महत्त्व वाटणार नाहीं. अगदीं लहानपणीं मी आंगणात एक गुलाबाची फांदी लावली होती. दररोज काळजीनें पाणी घालत असे. पण त्या झाडाचीं पानें वाळून एक एक निघून गेलीं. तसें नेहमी होतेंच. पण मला कांहीं माहीत नसल्यानें फार वाईट वाटलें. पण मी पाणी घालण्याचा क्रम चुकविला नाहीं. शेवटीं कांहीं

दिवसांनीं त्या काडीला सुंदर कोंवळीं पानें फुटलीं. मला खूप आनंद झाला. सर्वांना मी तो चमत्कार (!) दाखविला. मोठ्या माणसाना त्यात माझ्याइतकें आश्चर्य आणि आनंद कसा वाटणार! पण त्यानीं मला बरें वाटावें म्हणून खूप आनंद प्रकट केला. मला तें गुलाबाचें रोप अजूनहि स्पष्ट नजेरसमोर दिसत आहे. त्यावेळच्या बालिश आनंदासारखाच आज-चाहि हा दुर्बिणीचा आनंद होता. दीक्षित आणि गोळे या दोघानीं ती श्रम-पूर्वक तयार केली. त्या परिश्रमाचें फळ मिळालें. पण तिच्यात अजून पुष्कळ सुधारणा करायला पाहिजेत.

●

## १२-३-४३

येथें तुरुंगात आलेलीं पुस्तकें आहेत तरी कोणतीं हें एकदा पाहणें जरुर आहे. मागें एकदां सगळया पुस्तकाची यादी करण्याचा बूट निघाला होता आणि काही पुस्तकाची यादीहि झाली होती. पण पुन्हा कुठें माशी शिंकली कुणास ठाऊक! तें काम बंदच पडलें! यादी केली म्हणजे कोणा-जवळ कोणतीं पुस्तकें आहेत तें कळतें आणि मग तीं मिळविणें सोपें होतें. 'ब' वर्गातील राजबंदींनीं स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीं त्याच्या जवळील पुस्त-कांचें एक सुंदर प्रदर्शनच मांडलें होतें म्हणे. ते लोक हौशी आहेत. आता आमच्याकडेहि पुन्हा निदान यादी तरी करण्याच्या कामास सुरुवात केली पाहिजे. हें तुरुंगातील जग एका दृष्टीने फार विशाल आणि दुसऱ्या दृष्टीनें अगदीं क्षुद्र आहे. बाहेर पडल्यावर काय करावयाचे याची योजना ठर-विण्याच्या कामीं त्याची विशालता दृष्टीस पडते. शिवाय प्रातातील ठिक-ठिकाणचे प्रातिनिधिक बुद्धिमान् लोक एकत्र आल्यानें सर्व प्रांताचें सार एवढया थोड्या जागेंत आणल्यासारखें वाटतें आणि या एवढयाशा जागेंत सगळा प्रांत सामावलेला दिसतो. याच्या उलट अगदीं लहान लहान योजना आंखून त्या पार पाडणें हेंहि आम्हांला पुष्कळ महत्त्वाचें वाटतें.

उदाहरणार्थ टेनिस कोर्टावर पाणी टाकून त्याच्यावर रूळ फिरविणें. पुस्तकांची यादी ही अशीच एक महत्त्वाची गोष्ट वाटते.

*  *  *

आजच्या टाइम्समध्यें परवा पाहिलेल्या धूमकेतूबद्दल Jolley नावाच्या एका गृहस्थानें एक पत्र लिहिलें आहे. हा गृहस्थ म्हणतो कीं, सध्यां सप्तर्षींजवळ दिसणारा धूमकेतु हा अगदीं नवीन नसून गेल्या नोव्हेंबर डिसेंबरमध्यें पुनर्वसू नक्षत्राजवळ जो धूमकेतू दिसत होता तोच हा आहे. मिथुन राशींतून हा धूमकेतु कर्क व Leo minor यामधून आपला मार्ग आक्रमून सध्या सप्तर्षींजवळ आला आहे. आणि सप्तर्षींच्या तेजस्वी ताऱ्यामुळें त्याची जागा शोधणें सध्या सोपें होत आहे येवढेंच जानेवारी किंवा फेब्रुवारीमध्यें तो विशेष चागला दिसत असे. पण शेपूट असें त्याला केव्हाहि नव्हतेंच.

अण्याचा नागपूर स्टेशनवर अपमान झाल्याची बातमी खोटी आहे, असें सरकारतर्फे जाहीर करण्यात आलें होतें. आज माझ्या तें वाचनात आलें. पण मद्रासकडे काहीं तसाच प्रकार झाला आहे. अण्याची बातमी एक खोटी असेल पण असे प्रकार ठिकठिकाणीं घडतात याविषयीं शंका नाहीं.

*  *  *

सावरकरानीं आपल्या हिंदुपदपादशाही या पुस्तकाच्या दुसऱ्या विभागाच्या सुरुवातीस एक सुंदर उतारा दिला आहे तो आज वाचल्यावर उतरून घेतल्याशिवाय राहवत नाहीं. तो उतारा थॉमसमूरचा आहे.:—

“Go Freedom, whose smiles we shall never resign,
Go, tell the invaders the Danes.
‘Tis sweeter to bleed for an age at thy shrine,
Than to sleep but a minute in chains ”

( स्वातंत्र्यदेवते ! तुझें स्मितहास्य आम्ही कधींहि सोडूं इच्छित नाहीं. जा ! त्या डेन्सना—स्वारी करणाऱ्याना—साग, तुझ्या मंदिरात युगानुयुगें रक्तस्राव होत पडलेलें परवडलें पण पारतंत्र्याच्या शृंखलांत एक मिनिटभरहि मला झोंप नको. )

●

## १३-३-४३

आमची दुर्बीण **गोळे-दीक्षितांनीं** सुधारली आहे. दोन्ही काचाचा बिम्बबिंदु मोजताना परवा जरा चुकला होता. आज तो बरोबर मापून बसविल्यामुळें दुर्बीण सुधारली. प्रथम आम्ही चंद्राकडे पाहिलें. चंद्र बराच मोठा दिसतो. सुमारें ७ पट मोठें दाखविण्याची दुर्बिणीची शक्ति झाली आहे. त्यामुळें चंद्र बराच मोठा दिसला. आज रंगीबेरंगी छटानीं कांहीं त्रास दिला नाहीं. चंद्रावरचे खवले आणि उंचवटे चांगले दिसत होते. मी शनि, रोहिणी, व्याध वगैरे ताऱ्याचा वेध घेण्याचा प्रयत्न करून मग सहज दुर्बीण कृत्तिका नक्षत्रपुंजावर रोंखिली. तों काय आश्चर्य ! कृत्तिकापुंज एकदम माझ्या दृष्टिपथात आला. एरवीं एवढ्या लहानशा दुर्बिणींत कोणताहि तारा आणणें कठीण जातें. एक तर तिचा व्यास लहान आणि दुसरें मोठें कारण म्हणजे पाहणाऱ्याचा हात सारखा थोडा तरी कापत असतो. हातात दुर्बीण धरून पाहताना हात थोडा जरी हालला तरी इष्ट लक्ष्य दृष्टिपथातून बाहेर जातें. आता आम्ही एक लाकडी stand ( स्टॅंड ) करून घ्यावयाचा ठरविला आहे. तो तयार झाल्यावर त्यावर दुर्बीण बसवून एकदा ती चांगली रोखली म्हणजे मग कांहीं त्रास होणार नाहीं. आणि कोणताहि तारा अगर तारापुंज दृष्टीच्या क्षेत्रात आणून ठेविला कीं, कोणालाहि तो सहज पाहता येईल. मला पहिल्याच प्रयत्नात यश मिळाल्यामुळे साहजिकच फार आनंद झाला. नुसत्या डोळ्यानें कृत्तिकेचे तारे चांगलें स्पष्ट दिसत नाहींत, पण आमच्या दुर्बिणींतून ते अगदीं स्पष्ट दिसूं लागले. साधारणतः ते सप्तर्षींच्या आकाराचे वाटतात आणि त्यापैकीं दोन तारे तर चांगलेच तेजस्वी दिसतात. सर्व तारे चांगलें तेजस्वी आणि एकमेकापासून बऱ्याच अंतरावर दिसले. दीक्षितानीं अजून कृत्तिकेवर प्रयोग केला नव्हता. त्यामुळें मी मला काय काय दिसतें हें सांगितल्यावर त्याच्या चेहऱ्यावर अधीरतेचें जे पटल पसरले तें पाहून मला मोठी गंमत वाटली. त्याना मी दुर्बीण दिली आणि त्यानीं ती इष्ट दिशेला रोखली. पण त्यांना कांहीं तो पुंज पकडता येईना. पण थोड्या

प्रयत्नानंतर जेव्हां एकदा त्याना अकस्मात् तो तारापुंज दुर्बिणींतून दिसला तेव्हा ते एकदम आनंदानें उद्गारले, 'splendid !' ( सुंदर ! )

त्यानंतर मग अनेकांनीं तो पुंज पाहिला. मीहि पुन्हां ३।८ दां तो चांगला पाहून घेतला. यापेक्षा मोठ्या आकाराची एक काच व डोळ्याकडे धरावयाची एक लहान काच दीक्षितांनीं मागविली आहे. त्या कांचा आल्या तर फार बहार होईल. त्यातून पाहिलेला तारा साधारणपणें १०० पटीनें जास्त मोठा दिसेल असें वाटतें.

●

## १४-३-४३

तुरुंगासारख्या कोंडलेल्या जागेंत काही कांहीं वेळा मन विटतें. उत्कृष्ट पुस्तकें, थोर लोकाचें सान्निध्य, लिहिण्यावाचण्यास सवड या सर्व गोष्टी अशावेळीं कुचकामाच्या ठरतात. म्हणून बागकाम करावयाचें ठरविलें आहे. श्री. वांद्रेकर हे आमचे गुरु ठरले आहेत. त्याना बागकामाची बरीच माहिती आणि चांगलीच आवड दिसते. तसेंच ते या कामात कुणाला आळस करूं देत नाहींत. हातात टोपली, चाकू, खिळे घेऊन ते ठरलेल्या वेळीं कामाला हजर असतात. मी स्वतः, चूडामण पाटील, मंगेशभाई, टिमकभाई असे त्याच्याबरोबर, काम करणार आहों. बागकामात मौज असते. पण तितकेंच अंग मोडून काम करावें लागतें आणि ज्यावेळचें काम त्यावेळीं केलें तरच तें चांगलें होतें. आम्ही तयार करणार असलेली बाग चांगली होईल असें वाटतें. मनःपूर्वक केलेल्या शारीरिक श्रमांत किती आनंद वाटतो ! आमच्या या नव्या उपक्रमाकडे पाहण्याच्या इतर लोकाच्या अनेक दृष्टी आहेत. काहीं लोकांना वाटतें, 'काय ही मंडळी उगीच काहीं तरी करताहेत ! तें आपलें काम नव्हे !' काहीं लोकांना वाटतें, 'करतील चार दिवस उत्साहानें काम, मग देतील आपणच सोडून !' इतर काहीं तर स्वच्छ उपहास करतात. आणि काहीं लोक विशेष लक्षहि देत नाहींत. कांहीं जण खिशात हात घालून लांब उभे राहून सूचनांचा सपाटून वर्षाव करतात. पण कामाला

कधीं हात लावत नाहींत. काहीं थोड्या लोकाना मात्र कौतुक वाटतें व त्यांचा आम्हाला सारखा उत्साह असतो. आमची खात्री आहे कीं, काहीं दिवसांनीं आमची बाग सुंदर रोपट्यांनीं आणि अतिसुंदर फुलांनीं डोलूं लागली कीं, सर्वजण आम्हाला धन्यवाद देतील. अर्थात् आम्ही केवळ आमच्या मनोरंजनाकरिताच करीत आहों, धन्यवादासाठीं नाहीं!

●

## १५-३-४६

आमच्या येथील शांत जीवनप्रवाहात आणखी एक मोठी लाट उसळून गेली. हिंडलगा तुरुंगातून ८ राजबंदी आज येथें आले. बेळगावहून लोक आले आहेत असें ऐकताच मी धावतच गेलो. कारण बेळगावशी माझा फार जुना संबंध! माझें हायस्कूलचें शिक्षण तेथेंच सरदार्स हायस्कूलमध्यें झालेलें. त्यानंतरहि वडील बेळगावासच असल्यानें मी तेथें मधून मधून सारखा जात असेंच आणि त्यामुळें साहजिकच बेळगावबद्दल मला आपलेपणा अजूनहि वाटतो. प्रथम वाटतें, मनुष्याच्या लहानपणीं त्याचे जे संबंध आलेले असतात; त्याविषयीं त्याला जी आत्मीयता वाटते तितकी आत्मीयता पुढील आयुष्यातील घनतर संबंधाबद्दलहि वाटत नसावी. बेळगाव जिल्ह्यांत अनेक लोक माझ्या ओळखीचे असल्यानें येथें येणारे लोक कोण आहेत ही साहजिकच मला उत्कंठा लागून राहिली. मी जाऊन पाहतों तों बहुतेक मंडळी मला माहीत असलेलीच होती. आलेल्या मंडळींत खुद्द श्री. **गंगाधरराव देशपांडे** होते, **नारायणराव जोशी**, **बाबूराव ठाकूर**, **अध्यापक**, **हुली**, **केशवराव गोखले**, **जीवनराव याळगी** आणि **पुंडलीकजी** हीहि मंडळी होती. यापैकी गंगाधरराव, ठाकूर, जीवनराव यांची माझी ओळख होती व इतरांना मी ओळखीत होतों एवढेंच. केशवराव गोखले आणि पुंडलीकजी याना मी पुष्कळदा पाहिलें होते, त्याच्याविषयीं मला माहितीहि होती. पण अध्यापक हे मात्र मला बरेचसे नवीन होते. प्रथम गंगाधररावांना भेटलों. त्यांनीं माझी व माझ्या पत्नीची आणि

मुलींची चौकशी केली. माझ्या आईवडिलांची आणि भावाविषयींहि प्रश्न विचारले. त्याना भेटायला खूप लोक येऊं लागल्यामुळें मी तेथून उठलों आणि इतर मंडळींना भेटलो.

श्री. **गंगाधरराव** हे अखिल भारतीय पुढारी असल्याने त्याच्याविषयीं सर्वांना चांगली माहिती आहेच. येथे महाराष्ट्र आणि गुजरात, त्याप्रमाणेंच मुंबईचे पुष्कळ लोक आहेत. त्यात निरानिराळ्या मताचा अभिमान धरणारेहि लोक आहेत. पण त्या सर्वांना गंगाधररावाबद्दल जो नितात आदर आणि प्रेम वाटतें तें पाहून मोठें कौतुक वाटतें. लहानपणापासून गंगाधररावाचा मी मोठा भाविक श्रोता आणि एकप्रकारें पूजक असल्यानें त्याच्याविषयीं येथील लोकात इतका आदर असलेला पाहून मला फारच समाधान वाटलें. आपल्यात आज एक बडी अखिल भारतीय व्यक्ति आली आहे असेंच सर्वांना वाटत आहे. या वृद्ध तपस्व्याबद्दल वाटत असलेली निष्ठा, प्रेम आणि आदर ही प्रत्येकाच्या वागण्याबोलण्यात ओसंडून वाहत आहे. गंगाधरराव मागे कित्येक वर्षं वर्किंग कमिटीचे सभासद होते आणि मला वाटतें, पं. **जवाहरलाल** याच्याबरोबर कित्येक वर्षे कॉंग्रेसचे—राष्ट्रसभेचे—सरचिटणीसहि होते. बेळगाव कॉंग्रेसचे ते स्वागताध्यक्ष होते. मराठीइतकेंच ते कानडींतहि अस्खलित बोलूं शकतात. टिळकाचे एक निष्ठावंत अनुयायी म्हणून ते सर्वांस परिचित आहेत. एवढेंच नव्हे तर **टिळका**चा राजकीय वारसा सागण्याचा हक्क त्याना बराच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. आज त्याचें वय ७३–७४ आहे. या वयातहि त्याची वादविवादाची हौस आणि त्याचा अपूर्व स्वार्थत्याग आणि तरुणानाहि खरोखरी लाजवील असा उत्साह हीं पाहून हृदय अत्यादरानें भरून आल्याखेरीज राहत नाहीं. अजूनहि त्याची शरीरयष्टि ताठ, सरळ आहे. कानानें मात्र थोडेसें कमी ऐकूं येतें. चेहरा हंसतमुख आहे. त्याच्या चेहऱ्यावरील तेज मात्र वयोमानामुळें आणि कष्टामुळें कमी झालेलें दिसत आहे. परंतु एखादा जिव्हाळ्याचा विषय वादविवादास काढा. लगेच त्याचा चेहरा पूर्वीच्या तेजानें चमकूं लागतो.

मी बेळगावला हायस्कूलमध्यें होतों. त्यावेळीं गंगाधररावांचीं भाषणें आम्ही मोठ्या आवडीनें आणि उत्सुकतेनें ऐकत असूं. त्याचा सिंहासारखा

गंभीर आवाज आणि त्यावेळींहि शुभ्र केसामुळें शोभणारी आदरणीय शरीरयष्टि याचा त्याच्या हजारों श्रोत्यावर फार खोल परिणाम होत असे. आमच्या हृदयात देशभक्तीची ज्योत न कळत पेटविण्यास त्याच्या प्रभावी वक्तृत्वातील स्फुल्लिंगच कारणीभूत झाले. त्याना '**कर्नाटकचा सिंह**' ही पदवी लोकानीं उगीच दिली नाहीं. त्याचें धैर्य, त्याचें औदार्य, धडाडी आणि या सर्वांबरोबरच सारें रान दणाणून सोडणाऱ्या मृगराजाप्रमाणें त्याचा गंभीर आवाज या सर्व गुणानीं 'सिंह' ही त्याची पदवी सार्थ झाली आहे. मला आठवतें कीं, त्याच्या व्याख्यानाला लोक हजारोंनीं जमायचे. त्यावेळीं दूरध्वनिक्षेपक नव्हते. पण गंगाधररावाना त्याची गरजहि नव्हती. कितीहि मोठा श्रोतृसमूह असो, त्याचा आवाज दूरदूरच्या कोपऱ्यातून प्रत्येकाच्या कानावर आणि हृदयावर जाऊन आदळत असे. त्याच्या प्रभावी, अस्खलित भाषणानीं आमचीं हृदयें थरारून जात असत. आमच्यापुढे त्यांचा आदर्श सतत वास करीत असे. त्यांच्या वक्तृत्वाची ओळख महाराष्ट्रास आणि कर्नाटकास चागलीच आहे. पण हिंदुस्थानातील इतर प्रातातहि त्याचा तसाच लौकिक आहे. त्याच्या भाषणानीं आमचें हृदय अक्षरशः विरघळून डोळ्यावाटे तें ओघळून जात असे. त्याच्यासारखे परिणामकारक वक्तृत्व मी फारसें कोणात अजून पाहिलें नाहीं. त्याच्याविषयीं त्यावेळीं जी श्रद्धा आणि जो आदर आम्हा तरुण मुलात त्यावेळीं निर्माण झाला तो उत्तरोत्तर वाढतच गेला आणि आजहि त्याच्यापुढे अत्यादरानें मस्तक नम्र झाल्याशिवाय राहत नाहीं.

मी हायस्कूलचा विद्यार्थी असताना सरदार्स हायस्कूलच्या छात्रालयात राहत असे. पण पुढें वडिलाची बदली खुद्द बेळगावासच झाली, त्यामुळें आम्ही ठळकवाडीस राहूं लागलों. आम्ही श्री. **सुंठणकर** याच्या बंगल्यात राहात होतों व समोरच **याळगीं**चा बंगला आहे. या याळगींच्या बंगल्यातच गंगाधररावाचा बहुतेक मुक्काम असे. मी कॉलेजमध्यें शिकत असल्यानें सारखा ठळकवाडीत राहात नसलों तरी सुटींत तेथेंच जात असे आणि त्यामुळें गंगाधररावाना पाहण्याचा नेहमीं प्रसंग येई. त्याचीं भाषणें ऐकण्याचाहि काहीं वेळा प्रसंग येई. एक दोन वेळा **महात्माजी** बेळगावास आले

असताना त्याचाहि मुक्काम ठळकवाडीस असे. त्यावेळीं आम्ही धावत जाऊन त्याना त्याच्या बंगल्यात शांतपणानें पाहत-ऐकत असूं. त्यावेळची दुसरी एक गोष्ट मला आठवते. पं. जवाहरलाल याचा दौरा चालू होता. ते बेळगावला येणार होते. अर्थात् त्याचा मुक्काम याळगींच्याकडेच व्हावयाचा. त्याच्यासाठीं याळगींच्या मुलानीं आमच्याकडे एक नवीन टेबल होतें तें मागून नेलें. पण जवाहरलालाना थांबायला कुठला वेळ असायचा? ते त्याच्या घरीं आले. मला वाटतें त्यानीं स्नान केलें आणि आपलें टॉयलेट आटोपलें आणि ते तडक सभास्थानाकडे गेले. त्या टॉयलेटसाठीं त्यानीं आमच्या टेबलाचा उपयोग केला होता. आमच्या घरीं टेबल परत आलें तेव्हा त्या टेबलाचें आम्हाला केवढें कौतुक वाटलें. त्याच्या वैभवाचा आम्हाला हेवा वाटूं लागला. माझ्या धाकट्या बंधूंना तर आपलें टेबल जवाहरलालानीं वापरलें याचा खूपच आनंद झाला आणि ते उड्या मारूं लागले.

गंगाधररावांचं वक्तृत्व अजूनहि कसें दमदार आहे, याचा महाराष्ट्रीयाना जमनादास निवडणुकीच्या वेळीं अनुभव आलाच आहे. श्री. अण्णासाहेब लठ्ठे याच्याबरोबर त्यानीं दौरा काढला होता. त्यावेळीं गंगाधररावाची प्रकृति बरी नव्हती. पायावरहि काहीं व्याधि निर्माण झाली होती. त्याना धड चालवत देखील नव्हतें. पण राष्ट्रसभेच्या आणि जनतेच्या सेवेसाठीं त्याचा आत्मा धडपडत होता. राष्ट्रसभेविरुद्ध जमनादासांना पाठिंबा देताना टिळकाचा राजकीय वारसा सांगणाऱ्या केळकरांनीं, अशा अर्थाचे उद्‌गार काढले होते, 'कॉंग्रेस मेलेली या डोळ्यानीं पाहीन अशी मला आशा आहे.' ते शब्द वाचल्याबरोबर गंगाधरराव मेघगर्जनेलाहि लाजविणाऱ्या आवाजात म्हणाले, 'मी ठरविलें आहे कीं, महाराष्ट्रात माझा प्राण गेला तरी हरकत नाहीं, पण कॉंग्रेसचा संदेश महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून पोंचविल्याशिवाय मीं राहणार नाहीं.' त्याच्या हृदयाच्या खोल गुहेंतून निघालेल्या या गंभीर गर्जनेचा श्रोत्यानीं टाळ्याच्या कडकडाटानीं सन्मान केला हें सांगावयास नकोच. त्याच्या वक्तृत्वाचा जोर अजूनहि पूर्वीइतकाच कायम आहे हें पुन्हा एकदां मला कळून आलें.

त्याचें तें व्याख्यान आणि त्यातील वर दिलेले शब्द अजूनहि माझ्या कानात घुमत आहेत.

श्री. **याळगी** हे आमच्या समोरच बेळगावला राहत होते. त्याचा सराफीचा धंदा आहे, पण आयुष्य देशसेवेला वाहिलेलें आहे. त्यांचें सर्व कुटुंबच काँग्रेसप्रेमी आहे. सध्या **जीवनराव याळगी** याच्याप्रमाणेंच त्याचे बंधु **कृष्णराव** तुरुंगात आहेत. जीवनरावाच्या पत्नीहि तुरुंगाचा पाहुणचार घेत आहेत. त्याच्या कुटुंबातील बहुतेक सर्व मंडळींनीं केव्हा ना केव्हा तुरुंगाची हवा चाखली आहे. त्यांचें घर म्हणजे बेळगावचें सार्वजनिक अभ्यागतगृह आहे. कोणी लहानमोठे पुढारी बेळगावला आले कीं, त्याचा मुक्काम याळगींकडेच असावयाचा. अर्थात् त्याना आपल्या पिशवीचें तोंड काँग्रेस-कार्यार्थ किती मोकळें सोडावें लागत असेल याची कल्पनाच केलेली बरी. माझे बंधु, बहीण **शांति** व वडील बहिणीचा मुलगा मुरलीधर—जो लहानपणीं आमच्याकडेच शिक्षणार्थ असे—हे सर्व याळगींच्या घरीं मोकळेपणानें जात येत असत. त्यांचीं मुलेंहि आमच्या घरीं येत जात असत. त्यांच्यापैकीं **अरविंद** आणि आमचा **मुरलीधर** याची अगदीं जोडी असे. मला वाटतें, दोघांमधील अकृत्रिम स्नेहभाव आजहि कायम आहे. त्यावेळीं ते दोघे बालवयस्क होते. आज व्यवहाराच्या—संसाराच्या—उंबरठ्यावर उभे आहेत. याळगींच्या घरचीं **वसंत**, **अनंत**, **चिदंबर**, वगैरे मुलें आमच्या घरीं येऊन अगदीं मोकळेपणानें माझ्या वडिलांशीं गप्पा मारीत बसावयाचीं. मोठीं, सरळ, धाडशी होतीं तीं मुलें !

श्री. **बाबूराव ठाकूर,—धोंडो राजाराम ठाकूर**—हे बेळगांवच्या तरुण भारतचे संपादक. प्रथम '**तरुण भारत**' हें मासिक होतें आणि त्याचे संपादक श्री. **शंकर दिनकर करंदीकर** हे होते. पुढें त्याचें रूपान्तर साप्ताहिकांत झालें आणि श्री. ठाकूर हे त्याचे संपादक झाले. पण फक्त नांवापलीकडे या साप्ताहिकाला जुन्या मासिकाचा कांहींच वारसा मिळाला नाहीं असें दिसतें. नवीन साप्ताहिक ठाकूर यानींच स्थापिलें व आजपर्यंत त्यांनींच तें अत्यंत यशस्वीपणें चालविलें आहे. मध्यंतरीं कामाच्या सोयीसाठीं त्यांनीं पत्राचें संपादकत्व कांहीं इतर व्यक्तींवर सोंपविलें होतें पण पुन्हां

त्याना स्वतःलाच त्या कामाला जुंपून घ्यावें लागलें. जिल्हा पत्रात तरुण भारताचें स्थान किती उच्च आहे हे महाराष्ट्रातील जिल्हापत्राकडे वरवर नजर टाकणाऱ्यांनाहि सहज समजण्यासारखें आहे. वृत्तपत्र उपयुक्त, मनोरंजक आणि सर्वसंग्राहक करण्यासाठीं लागणाऱ्या सर्व साधनाचा ते कुशलतेनें उपयोग करतात त्यांचें संपादकीय धोरणहि स्वच्छ आणि तेजस्वी आहे. 'तरुण भारत' हें एक आदर्श जिल्हापत्र आहे अशी माझी ठाम समजूत आहे.

पण बाबुराव ठाकुराना पत्राचे क्षेत्र फार अपुरें पडतें. राष्ट्रीय विधायक कार्यांत ते नेहमीं असतातच. पण बेळगाव जिल्हा प्राथमिक शिक्षण समिति स्थापून तिचे कार्यवाह म्हणून त्यांनीं चालविलेलें कार्य मोठें महत्त्वाचें आहे. साक्षरताप्रसारकार्यात गुंतलेल्या कार्यकर्त्यांना या कार्याचें महत्त्व आणि त्याचा व्याप याची चागली कल्पना आहे. साऱ्या जिल्ह्यात पद्धतशीरपणें साक्षरता प्रसाराचें काम चालवून नवीन नवीन योजना आखून त्या पार पाडणें हें काम अत्यंत जबाबदारीचें आहे. तें काम हे करीत असतात. निष्ठावंत उद्योगी कार्यकर्ते म्हणून मी पुष्कळ वर्षांपासून त्याना ओळखीत आहे.

श्री. नारायणराव जोशी हे मुंबई विधि मंडळाचे उपाध्यक्ष होते. उत्तम वकील म्हणून त्यांची बेळगावला ख्याति आहे. श्री. हुली हे सौंदत्तीचे असून बेळगाव जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष आहेत. त्याना मागें म्हणे एकदां दहा वर्षांची शिक्षा झाली होती. त्यापैकीं साडेतीन वर्षें त्याना ती शिक्षा भोगावी लागली. त्यांना ज्ञानेश्वरी, तुकारामाची गाथा वगैरे संत वाङ्मय मुखोद्गत आहे. त्यांची मातृभाषा कानडी पण मराठी संतवाङ्मय त्यांनीं आपलेंसें केलें आहे हें खरोखर कौतुकास्पद होय. त्याची माझी ओळख नव्हती, त्याचप्रमाणें अध्यापकांचीहि ओळख, त्यांचें नांव ऐकण्यापलीकडे मला नाहीं.

श्री. केशवराव गोंधळे हे मुंबई विधिमंडळाचे सभासद असून कॉं. पक्षाचे प्रतोद होते. आम्ही हायस्कूलमध्यें बेळगांवास होतों तेव्हां त्यांनीं आपल्या राजकीय यात्रेस सुरवात केली होती. अलीकडे त्यांचीं व्याख्यानें ऐक-